500 ೫೦೦ ५००

# SHREE SAMSTHAN
# GOKARN PARTAGALI JEEVOTTAM MATH

500 ೫೦೦ ५००





2306

500 ೫೦೦ ५००

# PANCHA-SHATABDI MAHOTSAV

## at Partagali, Canacona - GOA

500 ೫೦೦ ५००

**Friday, 8th April to Sunday, 10th April 1977**

॥ श्री रामदेव वीर विठ्ठलौ प्रसन्नौस्ताम् ॥

We offer our humble Pranaams for the blessings of His Holiness Shrimad Vidyadhiraj Teertha Shripad Vader Swami of Shree Gokarn Partagali Jeevottam Math

and

Our sincere prayers to Shree Ramdev Veera Vithal for the spiritual uplift of mankind

# V. M. SALGAOCAR & BROTHER PVT. LTD.

Mine Owners ※ Mineral Ore Exporters

Ship Owners, ※ Barge Builders

&

Importers

P. O. Box No. 14

VASCO-DA-GAMA

**GOA - 403 802**

Grams : VIMSON

Telex : VIMSON 0191 - 211

Phones : 2394, 2405, 2437

*OFFICES AT*

**BOMBAY, NEW DELHI & BANGALORE**

श्री संस्थान गोकर्ण पर्तगाळी जीवोत्तम मठाच्या पंचशताद्धि महोत्सवा निमतीं आपैल्या मठाच्या शिष्यवर्गाच्या संमेलनावेकार

आमी मनापासून

मठाचो उत्कर्ष, सगळ्या समाजाची भरभराट

आनी

हें साध्य करून वेंक्क

परमपूज्य श्री स्वामीमहाराज श्रीमद्‌विद्याधिराजतीर्थ

हां कां

उत्तम आरोग्य आनी उदंड आयुष्य मेळचें

अशें

श्रीरामदेव वीरविठ्ठलाकडे अंतःकरणापासून मागतां.


KONKANI CENTRE LIBRARY
2306
कोंकणी पुस्तकालय

पणजे-गोय, ता. ८-४-१९७७

**मेसर्स पुरुषोत्तम रामनाथ केंणी आनी हॉटेल मांडोव्ही**

तारेचोपत्तो : **श्रीरामनाथ-पणजे**

तेलेफोनाचो नंबर : २३०६

तारेचोपत्तो : **मांडोव्ही पणजे**

तेलेफोनाचे नंबर : २२८६ ते २२९०

# TALAULICAR INDUSTRIES

Manufacturers & Exporters
of
NATURAL RED OXIDES
of the purity of above 96%
conforming to I. S. Specifications

*SHADES* :
I. S. 412 & I. S. 449

*Bankers:*
Canara Bank
Central Bank of India
State Bank of India
PANAJI - GOA

*Registered Office* :
" HIRA MAHAL "
PANAJI - GOA
Gram : ' HIRA '
Phones : Off. 2615 Res. 3221

## Shree Samsthan Gokarn Partagali Jeevottam Math
## Pancha-Shatabdi Mahotsava Samiti Central Committee

1 Shri Vasantrao Srinivassa Sinai Dempo, President, Panjim
2 " Puruxotoma Ramanata Quenim, Vice-President, Panjim
3 " Panduronga Datta Kamat Timblo, Vice-President, Margao
4 " Voicunta Srinivassa Shenvi Dempo, Vice-President, Panjim
5 " Gurudas Datta Kamat Timblo, Vice-President, Margao.
6 " Vassudev Mahadeo Salgaocar, Vice-President, Vasco Da Gama
7 " Vishnu Vassudeva Kamat Tarcar, Vice-President, Panjim
8 " Anant Narcinva Naik, Vice-President, Margao
9 " Madhusudan Datta Kamat Timblo, Vice-President, Margao
10 " Madhav Upendra Sinai Talaulicar, Vice-President, Panjim
11 " Ramcrishna Mahadeo Salgaocar, Vice-President, Vasco Da Gama
12 " Vishnu Soiru Naik Gaunecar, Vice-President, Panjim
13 " Vassanta Subraya Joshi, Vice-President, Vasco Da Gama
14 " Venctesh Govind Kamat Azrekar, Vice-President, Mapusa
15 " Ammembal Narayan Pai, Vice-President, Bangalore
16 " Rangappa Pandurang Kamat, Vice-President, Hubli
17 " Nagappa Subraya Pai, Belgaum, Vice-President
18 " Manjunath Vaikunth Shanbhag Burdekar, Vice-President, Kumta
19 " Anant Mukund Kamat (Macson), Vice-President, Bombay
20 " Dr. Ammembal Purushottam Pai, Vice-President, Bombay
21 " Pundalik Kantu Naik, Vice-President, Bombay
22 " H. Ananda Rao, Vice-President, Bombay
23 " Madhavrao Achyut Pai, Vice-President, Bombay
24 " Baba Hiru Naik, Vice-President, Morgim
25 " Atchuta Gopal Pai Raiturkar, Treasurer, Margao
26 " Chandrakant Shantaram Keni, Secretary, Margao
27 " Madhukar Yeshwant Mordekar, Jt. Secretary, Margao
28 " Srinivassa Trivicrama Sinai Cuncoliencar, Jt. Secretary, Margao
29 " Damaji Bablo Shenvi Kossambe, Jt. Secretary, Margao
30 " Panduranga Jaganata Poi Fondecar, Jt. Secretary, Margao

श्रीमठ पर्तगाळी
श्रीशके १८९९
पिंगल संवत्सर
चैत्र शु॥१० मी
बुधवार

श्री विठ्ठल

श्रीमत्सकल सुरनिकर मुकुटमणिरंजित दिव्य
श्रीरामदेव वीरविठ्ठल चरणकमलसंततानुराधक
श्रीसंस्थान गोकर्ण पर्तगाळी जीवोत्तम मठाधीश
श्रीमत्कमलानाथतीर्थ श्रीपाद वडेर करकमलसंजात
श्रीमद्द्वारकानाथतीर्थ श्रीपाद वडेर वरकुमारक
श्रीमद्विद्याधिराजतीर्थ श्रीपाद वडेर यांनीं




अत्यन्त प्रिय शिष्यवर्गान्तर्गत वसंत श्रीनिवास शेणवी धेंपे: पंचशताब्दि महोत्सव समिति अध्यक्ष यांस श्रीमन्नारायण स्मरण पूर्वक केला आशीर्वाद.

श्री संस्थान गोकर्ण पर्तगाळी जीवोत्तम मठस्थापनेपासून यंदा ५०२ पांचशें दोन वर्षें होत आहेत. आद्य मठाधीश श्रीमन्नारायणतीर्थ श्रीपादवडेर यां पासून आमचे गुरुवर्य पर्यंत परंपरा २२ झालेल्या आहेत. अशा विद्वान तपोनिष्ठ चारित्र्यवान् अगाध कर्तृत्ववान् स्वामीजींचा इतिहास ऐकून अलीकडील स्वामीजींचा व्यवहार समितींतील लोकांनीं जाणून भारतभर पसरलेल्या शिष्यवर्गाचा व श्रीसंस्थानचा परिचय व सुदृढ संबंध राखणें विषयीं विचारविनिमय करणेच्या उद्देशानें तुह्मीं महापर्वणिकाल ह्मणजे पंचशताब्दि निमित्त त्रिदिनात्मक महोत्सव कार्यक्रम ठरविलेला आहे. हें समजून फार संतोष होत आहे. असें हें महान् कार्य अनेक लोकांच्या सहायानें होणेंचें असल्यानें त्यां त्यां लोकांकडून तुह्मांस सहाय्य मिळो आणि श्रीरामदेव वीरविठ्ठल कृपेनें तुह्मीं अंगीकृत वरील महान् कार्य निर्विघ्न पार पडो व अध्यक्षांसह सर्व समितीच्या सभासदांस तसेंच या कार्यांत तनुमनधन द्वारा सहाय्यकांनाही आयुरारोग्यैश्वर्यादि प्राप्त व्होवो. असें श्रीरामदेव वीरविठ्ठल सन्निधीं प्रार्थून आशीर्वाद देत आहोंत.

श्री

# श्रीसंस्थान गोकर्ण पर्तगाळ जीवोत्तम मठ

# पंचशताब्दि महोत्सवाचें प्रयोजन

गोव्यात आणि देशात सर्वत्र इतिहासवशात् विखुरल्या गेलेल्या सारस्वत समाजाच्या अस्मितेचा व एकतेचा प्राणरक्षक मानदंड असें ज्याला सार्थपणे संबोधता येईल त्या श्रीसंस्थान गोकर्ण पर्तगाळ जीवोत्तम मठाचा पंचशताब्दि महोत्सव यंदा साजरा होत आहे. ही अतीव आनंदाची व समाधानाची बाब आहे. समाधान अशासाठी की, एका समाजाच्या संधारणाचे व संघटनाचें कार्य सतत पांच शतकें यशस्वीपणें पार पाडून तो समाज अधिकाधिक ऊर्जस्वल बनविणाऱ्या मठाच्या यशोगाथेचें हें संकीर्तन आहे. आणि आनंद अशासाठी की, असा हा अपूर्व सोहळा घडवून आणण्याचें व त्यांत सहभागी होण्याचें भाग्य आम्हा मठानुयायांना लाभत आहे. हा सोहळा स्वातंत्र्याच्या वातावरणांत साजरा होत आहे हाहि एक विशेष होय. श्रीमठाच्या इतिहासांत यापूर्वी महत्वाचे टप्पे आले नाहीत असें नव्हे. पण त्या टप्प्याचें कायम स्मरण राहावें, इतिहासात त्यांची कायमची नोंद राहावी अशा दृष्टीनें त्यांना सोहळयाचें रूप देणें पारतंत्र्यामुळें शक्य झालें नव्हतें. पांच शतकांची गौरवशाली परंपरा असलेला असा हा मठ आहे. या मठाची पंचशताब्दि साजरी करण्यामागील हेतु आत्मप्रौढीचा नाहीं. मठाला तशा गोष्टीची गरजहि नाहीं. कारण कसल्याहि प्रकारची जाहिरातबाजी वा प्रचार न करतां गेलीं पांच शतकें मठानें आपलें अंगीकृत कार्य अखंडितपणें चालविलें आहे. हें कार्य केवळ शिष्यपरिवारापुरतेंच नव्हे तर सर्वांनाच ज्ञात आहे. आणि सर्वांनाच ह्या कार्याची कृतज्ञतापूर्वक नोंद घेणें भाग पडलेलें आहे.

श्रीमठाला तेवीस स्वामींची अखंडित परंपरा लाभली आहे आणि या स्वामींनी अक्षरशः आसेतु हिमाचल पुण्यसंचार करून धर्म व अध्यात्म यांचा प्रचार व प्रसार केला आहे. अनेक अस्वस्थ मनांना दिलासा दिला आहे.

पंचशताब्दि महोत्सवाचा एक भाग म्हणून पर्तगाळी विकास योजनेचा शुभारंभ करण्यासाठी चैत्र शुद्ध द्वितीया शके १८९९, सोमवार, दिनांक २१ मार्च १९७७ हा दिवस निश्चित करण्यांत आला. ह्या दिवसाचे माहात्म्य मठाच्या व मठानुयायांच्या दृष्टीनें आगळेंच आहे. ह्या दिवशीं श्रीसंस्थान गोकर्ण पर्तगाळी जीवोत्तम मठाच्या संस्थापनेस ठीक ५०२ वर्षे पूर्ण झालीं. त्या दिवशीं वर्षापूर्वी फलुमारु मठाधीश उडपी, श्रीरामचंद्रतीर्थ बदरिकाश्रमांत गेल्यावेळीं समवेत असलेल्या माधव नामक अत्यंत चाणाक्ष, हुशार व कुलशील संपन्न अशा ब्रम्हचाऱ्यास संन्यासाश्रम देऊन श्रीमन्नारायणतीर्थ नामाभिधान बहाल केलें आणि श्रीवीर रामचंद्राची मूर्ती त्यांच्या स्वाधीन करून पश्चिम भारतात त्यांच्या समाजाला धर्मोपदेशासाठी प्रेषित केलें. हेच श्रीनारायणतीर्थ स्वामी महाराज प्रस्तुत मठाचे संस्थापक होत. विशेष योगायोग हा कीं शालिवाहन शकाच्या तिथीनुसार मठाचे विद्यमान स्वामीजी श्रीमत् विद्याधिराजतीर्थ यांच्या गुरुपीठारोहणाची तिथीहि चैत्र शुद्ध द्वितीया हीच आहे. त्यामुळें मठानुयायांच्या दृष्टीने यंदाचा २१ मार्च हा दिवस एक प्रकारें कपिलाषष्ठीचा योग ठरला.

तशी पर्तगाळी मठाच्या संस्थापनेची कथाहि निराळीव योगायोगाचीच आहे. श्रीमन्नारायणातीर्थ स्वामी यांनीं बदरिकाश्रमाहून येऊन भटकळ येथें संप्रदायाचा पहिला मठ स्थापन केला. (या मठाचा पंचशताब्दिनिमित्त जीर्णोद्धार करण्याचें कार्यहि विद्यमान स्वामीजींनीं आरंभिलें आहे.) या मठाच्या परंपरेतील तिसरे स्वामी श्रीमज्जीवोत्तमतीर्थ श्रीपाद वडेर यांनी श्री गोकर्णक्षेत्रीं, कोटितीर्थावर दुसरा मठ स्थापन केला. या गोकर्ण मठांत मुक्कामात असतांना श्रीमद्रामचंद्रतीर्थ श्रीपाद वडेर या पीठाच्या सहाव्या स्वामींना असा दृष्टांत झाला कीं, सांप्रतच्या मठाच्या मागच्या बाजूला भूगर्भांत स्वयंभू चार प्रतिमा आहेत. स्वामीजींनीं तो श्रीरामचंद्राचा आदेश मानून उत्खनन केलें आणि बरेंच पाषाण भेदल्यानंतर तेथें श्रीराम, सीता, लक्ष्मण व

मारुती अशा चार मूर्ति सांपडल्या. ह्या मूर्ती मठांत आणून त्यांची प्रतिष्ठापना करण्याचा स्वामीजींचा मनोदय होता. परंतु त्याच रात्री पुन्हां असा दृष्टांत झाला कीं, ह्या मूर्ती घेऊन स्वामीजींनी भारताच्या पश्चिम किनाऱ्याने उत्तर दिशेकडे जावे आणि मूर्तिवाहकांना त्या भारी वाटूं लागतील अशा ठिकाणीं मुक्काम करून पुढील आदेशाची प्रतीक्षा करावी. त्या आदेशानुसार दुसऱ्या दिवशीं पहांटे स्वामीजी, मूर्तिवाहक व इतर शिष्यपरिवारांच्या समवेत उत्तरेच्या दिशेनें संचारास निघाले. सूर्यास्ताच्या सुमारास स्वामीजी आपल्या-परिवारासह गोव्यांतील पैंगीण गांवी पोहोचले असतां पैंगी ऋषिंच्या आश्रमाजवळ थकलेल्या वाहकांनी मूर्तींच्या टोपल्या खाली ठेवल्या. त्या दिवशीं स्वामीजींनी पैंगि ऋषिंच्या आश्रमांतच मुक्काम ठेवून श्रीरामचंद्राच्या पुढील आदेशाची ते प्रतीक्षा करूं लागले.

पहांटे स्वामीजींना स्वप्नांत पुन्हां दृष्टांत झाला. या खेपेला असा आदेश मिळाला कीं स्वामीजी, परशुराम भूमीत दाखल झालेले असून उद्या परशुरामाची धेनु स्वत: येऊन स्वामीजींना पुढील मार्ग दाखविल. आणि खरोखरच तसेंच घडलं. सूयोदयाबरोबरच श्रींच्या मुक्कामाच्या दारांत एक गाय येऊन दाखल झाली. स्वामीजींनी धेनूचे पूजन वगैरे केल्यावर गाय चालू लागली. तिच्या मागोमाग स्वामीजींचा परिवार चालत होता.

उत्तरेच्या दिशेनें डोंगर-जंगलें तुडवीत गाय कुशावती नदीच्या तीरावर येऊन थांबली व तेथें एके ठिकाणीं तिनें दुधाची धार सोडली. त्या ठिकाणीं श्रीराम, सीता व लक्ष्मण ह्या तीन मूर्तींची प्रतिष्ठापना करून सध्याचा पर्तगाळी मठ स्थापन करण्यांत आला. पण गाय पुन्हां चालूं लागली व तिने थेट रिवण येथें जाऊन दुसऱ्यांदा दुधाची धार सोडली. तेथेंहि एक मठ उभारून मारुतीच्या मूर्तींची प्रतिष्ठापना करण्यांत आली. नंतर श्रीमद्रामचंद्रतीर्थ स्वामींनीं शिष्याश्रम देऊन श्रीमत्-दिग्विजय रामचंद्रतीर्थ असें नामाभिधान करून पर्तगाळी मठांत त्यांना स्थापन करून स्वत: तपश्चर्येसाठीं रिवण मठाच्या जवळच एक उत्तम गुहा बांधून त्यांत तपश्चर्या करूं लागले. नंतर कांही वर्षांनीं त्याच ठिकाणीं ते वृन्दावनस्थ झाले.

मठाची स्थापना झाली त्या सुमारास भारताचा पश्चिम भाग इतिहासाच्या दुर्दैवी फेऱ्यांत सांपडला होता. खुद्द गोव्यांत पोर्तुगीज अधिमत्ता प्रस्थापित होऊन त्यांनीं ख्रिस्तीकरणाचें सत्र आरंभिलें आणि अनेक लोक धर्म व संस्कृतिरक्षणासाठीं आपापल्या कुलदेवांचे स्मारक घेऊन कोचीन, भटकळ, मंगळूर वगैरे प्रदेशांत जाऊन राहिले. सामान्यपणें वेगळ्या वंशाच्या व भाषेच्या वातावरणांत नव्यानेंच स्थायिक होणारे लोक एक-दोन शतकें कशाला एक-दोन पिढ्या उलटल्या कीं आपल्या मूळ व्यक्तिमत्वाचा विसर पडून तेथील समाजजीवनाच्या अंवतीभंवतीच्या परिसराचा भाग बनतात. पण पर्तगाळी मठाच्या अनुयायांच्या बाबतींत अशी गोष्ट घडली नाहीं. आपली मूळ भूमि सोडून अनेक शतकें उलटल्यानंतरहि त्यांनी आपलें स्वतंत्र व्यक्तिमत्व, स्वभाषा स्वसंस्कृति व स्वपरंपरा अबाधित राखिली आहे, याचें श्रेय मठानुयायांच्या अंगभूत प्रकृतीला जसें जातें तसेंच, किंबहुना त्याहून अधिक प्रमाणांत, मठाच्या स्वामींचा यासाठीं महत्वाचा हातभार लागला आहे. पर्तगाळी मठाच्या स्वामींनीं जेव्हां जेव्हां संधि मिळाली तेव्हां तेव्हां जेथें जेथें शिष्यपरिवार पोहोंचला आहे तेथें तेथें जाऊन धर्म व संस्कृतीचा प्रचार व प्रसार केला आणि मठानुयायांना एकत्र ठेवणारा निष्ठातंतु बळकट बनविण्याचें महाकार्य पार पाडलें. मठानुयायांचे वैयक्तिक व सामाजिक प्रश्न सोडविण्यास व त्यांना एकसंघ राखण्यास मदत केली. परंतु मठाधिपतींनीं हें कार्य कितीहि निष्ठापूर्वक चालविलें तरी ऐतिहासिक कारणांसाठीं त्यावर मर्यादा पडत होती. कारण मुख्य मठ व बहुसंख्य शिष्यपरिवार जेथें होता तो गोवा पोर्तुगीजांच्या सत्तेखालीं पारतंत्र्यांत दिवस कंठीत होता. तर मठानुयायी गोव्याबाहेर जेथें वास्तव्य करून होते ते प्रदेश विभिन्न व्यवस्थेखालीं विभागले गेले आहेत. परिणामीं मठाच्या शिष्यपरिवारांमधील आपसांत संपर्क तुटला. समाजाचे एका अर्थाने परस्परांना एकत्र ठेवणारे धागेच तुटले व एकमेकांत गुंतले गेले. मात्र गुंत्यांत अडकलेल्या या धाग्याचें एक टोंक दृढपणें मठाकडे राहिलें आणि म्हणूनच परस्परांशी संपर्क तुटूनहि शिष्यपरिवाराची निष्ठा मठाशीं दृढपणें बद्ध राहिली.

भारत पूर्वीच स्वतंत्र झाला होता. गोवाहि आतां मुक्त झाला आहे. अशावेळीं मठाकडे दृढपणें बद्ध अस-

लेल्या निष्ठेच्या धाग्याचा मागोवा घेत त्याची टोकें एकत्र जमवून ती नव्यानें एकत्र जोडून एक मलग धागा पुन्हा बनविण्याचा एक भाग म्हणून मठाचा पंचशताब्दि महोत्सव साजरा करण्यांत येत आहे. पोर्तगीज राजवटीत गोव्यांत खूपच धार्मिक छळ झाला. देवालयें उद्ध्वस्त झाली. समाज भंगला. पण पर्तगाळी मठाच्या मार्गदर्शनामुळें संस्कृति अभंग राहिली. समाज तुटला पण नमला नाही. त्या तेजस्विनेच्या मठाच्या शिष्यपरिवारांत वसत असलेल्या सुप्त अंशाला फुंकर घालून मठानेच तो प्रज्वलित केला. सामाजिक व आर्थिक स्वरूपाचे अनेक प्रश्न निर्माण झाले. ते स्वामींच्या आज्ञेनें व हस्तक्षेपानें सामोपचारानें मिटविले गेले. संस्कृतीची उभारणी मंदिरांभोवती झालेली असल्यानें मंदिरें भंगलीं तेव्हा संस्कृतीच नष्ट होण्याचा धोका निर्माण झाला असतां मंदिरांची पुन्हा प्रस्थापना करून नव्याने संस्कृति विकसित करण्याचें कार्य मठानें केलें. जें गोव्यांत घडलें तेंच इतर राज्यांनहि घडलें आणि म्हणूनच केरळसारख्या सुदूर प्रदेशांतहि मठाचा शिष्यपरिवार एक लहानसें मंदिर उभारून एकोप्यानें राहूं शकला व त्याचा गोव्याशी सांस्कृतिक संबंध कायम राहिला.

मठाचे विद्यमान स्वामीजी श्रीमन् विद्याधिराजतीर्थ श्रीपाद वडेर यांच्या प्रेरणा व मार्गदर्शनामुळेंच मठाची पंचशताब्दि साजरी करण्याचा योग निर्माण झाला आहे. श्रीमद् विद्याधिराजतीर्थ श्रीपाद वडेर स्वामी यांची दिव्यदृष्टी शिष्यपरिवाराला संघटित करून राष्ट्र व समाजकार्यासाठी अधिक प्रवण करण्याची प्रामाणिक तळमळ आणि मठाचीं सूत्रें हातीं आल्यापासून त्यांनी त्या दिशेनें चालविलेले योजनाबद्ध प्रयत्न यांचाच परिणाम म्हणून हा पंचशताब्दि महोत्सव घडून येत आहे. स्वामीजींचा धर्म, तत्वज्ञान, अध्यात्म व वेदान्त यांचा अभ्यास तर सखोल आहेच पण त्याचबरोबर आधुनिक विज्ञान, समाजशास्त्र, इतिहास आदि विषयांच्या चिकित्सक परिशीलनाची जोड त्यांच्या उपजत अभिजात प्रज्ञेला लाभलेली असल्यामुळें, त्यांच्या अल्प कार्यकालांतहि मठाची प्रतिष्ठा व शिष्यपरिवाराचा माथा उन्नत बनला आहे आणि शिष्यवर्ग मठाकडे अधिक विश्वासानें व भविष्याविषयीच्या अतूट श्रद्धेनें आकृष्ट झाला आहे.

मठाचा पंचशताब्दि महोत्सव, विशिष्ट उद्दिष्टें नजरेसमोर ठेवून तीं साध्य करण्याच्या दृष्टीनें एक महोत्सव समिती स्थापण्यात आली आहे. शिष्यपरिवारामधील मध्यंतरीच्या काळांत तुटलेले हे धागे पुन्हां जोडून, एकसंघ समाज निर्माण करणें हें पंचशताब्दि महोत्सव समितीचें प्रमुख कार्य आहे. आणि म्हणूनच यंदा एप्रिल महिन्यांत दिनांक ८, ९, व १० असे तीन दिवस पर्तगाळी येथें शिष्यपरिवाराचें एक स्नेहसंमेलन घडवून आणण्यांत येत आहे. स्नेहसंमेलनाच्या निमित्तानें देशांत सर्वत्र विखुरलेल्या शिष्यपरिवाराला परिचय व कुलदेवताचें दर्शन घडावें हा या नियोजित संमेलनाचा उद्देश असला तरी तो एकमेव हेतु नाही. शिष्यपरिवारांत परस्पर परिचय घडवून उद्दिष्टपूर्तीचें खोटें समाधान मानण्याची पंचशताब्दि समितीची इच्छा नाही. या स्नेहसंमेलनामुळें समाजाचे प्रश्न समजून घेण्याचा समितीचा प्रयत्न राहील. वास्तव्यप्रदेशाप्रमाणें शिष्यपरिवाराचे प्रश्न भिन्न आहेत. ते सोडविण्याची एखादी कायम व्यवस्था करण्याच्या दृष्टीने या स्नेहसंमेलनांत एक परिसंवाद आयोजित करण्यात येणार असून, प्रश्नाची व्यापकता व विविधता विचारांत घेऊन त्यासाठी दोन दिवस राखून ठेवण्यांत आले आहेत. खुल्या अधिवेशनानें या स्नेहसंमेलनाची सांगता होईल आणि यांत सहभागी होणारा प्रत्येक मठानुयायी नव्या प्रेरणा, शक्ति व उत्साह बरोबर घेऊन परत जाईल असा समितीला विश्वास वाटत आहे.

पंचशताब्दि महोत्सवाचा भाग म्हणून अनेक योजना आखण्यात आलेल्या असून त्यांत जीर्ण मठांच्या जीर्णोद्धाराचा समावेश आहे. या योजनेंत गंगातटाकीं असलेल्या पुरातन मठाचा जीर्णोद्धार व देव प्रतिष्ठा यापूर्वीच पार पडलेली आहेत. त्याचप्रमाणें पर्तगाळी मठाचाही जीर्णोद्धार करण्यांत येणार आहे. पर्तगाळी मठ हें अध्यात्म व संस्कृतीचें केंद्र व्हावें या दृष्टीनें एक बृहद्योजना आंखण्यांत आलेली असून ही योजना साकारल्यानंतर शिष्यपरिवाराला राहाण्यासाठी सर्व सुखसोयींनी सुसज्ज निवास, सभासंमेलनादि कार्यक्रमासाठी विशाल सभागार, धार्मिक विधीव्यवस्था आणि अन्य सुविधा उपलब्ध होतील. पर्तगाळी येथें एक संस्कृत विद्यापीठ स्थापण्याची योजना विचारांत असून हे सर्व कार्यक्रम व योजना टप्प्याटप्प्यानें हातीं घ्यावयाच्या आहेत. ही सर्व कार्यें असलीं तरीं मुख्य कार्य विखंड झालेल्या समाजाला अखंड बनविण्याचे आहे. समाज अखंड बनविण्याचा

प्रयत्न खूप अंशी भौतिक असला तरी सामाजिक व आर्थिक गरजेंतून तशी आवश्यकता निर्माण झाली आहे. समाजाचा एक वर्ग सामाजिक व आर्थिक दृष्टचा मागास राहिला तर समाजाला स्वास्थ्य लाभत नाहीं. तसेंच एका संप्रदायाचे लोक पुढारलेले व अन्य घटक मागासले राहिले तर समाजाचा निकोप विकास होत नाहीं. हा सर्व असमतोल दूर करणें हाहि मठाचा प्रयत्न राहील. त्यासाठीं शिष्यपरिवार प्रथम संघटित करून त्यांचे प्रश्न सोडवितानांच सभोंवतालच्या अन्य समाजाला उद्धरणासाठी मदतीचा हात देणें हा मठाचा यापुढील कार्याचा भाग राहील. कारण शिष्यपरिवाराबरोबरच अन्य समाजहि समस्यामुक्त झाला पाहिजे. त्यांतच शिष्यपरिवाराचें हित आहे अशी मठाची मनोमन धारणा आहे. पुंजक्या पुंजक्यानीं विकास व समृद्धी येऊन सभोंवतालचा परिसर वैराण वाळवंटासम राहिला तर वाळवंट त्या समृद्धीच्या हिरवळीला ग्रासून टाकण्याचा धोका संभवतो याची आम्हांला जाणीव आहे. या मागें मठाचा अभिनिवेश वा वृथा अभिमान नाहीं. आमची अशी मनोमन धारणा आहे कीं राष्ट्रीय एकात्मतेचा आरंभ समाजांतील वेगवेगळचा घटकांमध्यें एकात्मता विकसित करूनच होऊं शकतो. समाजाचा एक घटक स्वावलंबी व समर्थ बनला तर तो अन्य घटकांनाही मदत करू शकतो. मठाच्या यापुढील प्रत्येक योजना व कार्यक्रमामागील उद्देश व दिशा या राहतील. पंचशताब्दि महोत्सव समितीनें हातीं घेतलेल्या सर्व योजना साकार होण्यासाठी शिष्यपरिवाराचें सहकार्य आवश्यक आहे. मठाच्या अनुयायांनीं हें नवें अंगीकृत कार्य पार पाडण्यासाठीं आणि स्वतःबरोबरच एकंदर समाज आर्थिकदृष्टचा समृद्ध वैचारिकदृष्टचा प्रगल्भ, समाधानाच्या दृष्टीनें परिपूर्ण व सांस्कृतिकदृष्टचा उन्नत बनविण्यासाठीं स्वयंसेवी वृत्तीने पुढें यावें आणि त्या दृष्टीनें संकल्पबद्ध होऊन नवीन प्रेरणा, चेतना व उज्ज्वल भविष्याची दृढ आशा यांची शिदोरी गांठीशी बांधून कार्यप्रवण होण्यासाठी एप्रिल महिन्याच्या ८, ९ व १० दिनांकाना होणाऱ्या शिष्यपरिवाराच्या स्नेहसंमेलनांत सहभागी व्हावें, ही विनंती.

---



H. H. Shrimat Vidyadhiraj Teertha Swamiji lay the Foundation Stone of the Partagali Development Plan on Monday, the 21st March 1977. On this very auspicious day ( चैत्र शुद्ध द्वितीया ) 502 years ago, the Math itself was founded by Shreemat Narayana Teertha Swamiji.




**RTAGALI JEEVOTTAM MATH (Partagali - GOA)**

**Architects - kanvinde and rai**



Age-Old " VATAVRIKSHA " on the grounds of the Partagali Math. The Octopus-like talons of the tree spread over a vast area and houses a Shiv-Linga and is called BRAMHASTHAN. This banyan tree is, perhaps, surpassed only by the one at Adyar-Madras and the other in the Geological Gardens of Calcutta. Under the Master Plan for which the foundation stone was laid by H. H. Vidyadhiraja Teerth Swamiji on the 21st March 1977, all the lands surrounding the Math including the Bramhasthan are being developed as a Centre of Pilgrimage and Tourist attraction.

# Vatavriksha वटवृक्ष

Far away from the maddening crowd's ignoble strife, on the banks of the sacred rivulet Kushavati is located the Village Partagali. This tiny village is well known in the spiritual history of this territory. The headquarters of Shree Samsthan Gokarn Partagali Jeevottam Math is located there in sylvan surroundings of unparallelled scenic beauty. But ancient still is the huge Banyan tree (Vatavriksha) which has really been a Tapasya Kshetra for over a thousand years. Beneath the cool shade of this Vatavriksha, the ancient Rishi Paingi had his meditation and many a Rishi and Yogi since then have come face to face with God, in this remote but original place popularly known as Bramhasthan.

It has been the spirit of Indian culture to treat vegetation and animal world as their kith and kin and we have been adoring them on special occasions Go-pooja and Vrikshapooja is a part of our salutation to the Almighty. Vatavriksha is a sacred tree. It is a symbol of the uninterrupted past glory and eternal wheel of life. Vatavriksha knows no decay or death. Its root grown atop the branch, lower themselves down to the ground and develop themselves into new trunks thus giving a new life to the tree. This tree can shoulder a number of trees on it and provide shelter to animal and bird life. A day has been specially reserved in the Hindu Calendar on which ladies perform the pooja of Vatavriksha. Many a mythological tale have been associated with Vatavriksha.

There are a few ancient Vatavriksha in our country and one of them is at Partagali. Walk a distance of about two hundred metres to the north of the Math and there you see the banyan tree (Vatavriksha) with its branches spreading horizontally over a large area and its 220 aerial roots hanging from the branches and entering deep into the soil to give support to the trunk of the tree. It is, indeed, an ecstatic sight. When one enters the place and moves through the innumerable aerial roots, one gets the impression of walking through a grove of palm trees, enjoying the cool breeze gently blowing from all directions. It looks as if the tree is bestowing upon the visitors its love and affection in the form of its pleasant shade. The length of the total area covered by the tree, measured from east to west 235 ft. and from North to South is 225 feet. Considered as over a thousand years old this Vatvriksha and the Ishwarlinga in front of it are worshipped by the people of Partagali and its adjoining areas.

The purity and sacredness of the place is preserved with utmost care. Not a single leaf or branch of the Vatavriksha or any other plant growing in the Bramhas than is cut down, nor any leaf or branch fallen on the ground is used as firewood. One can enter the holy place barefooted only. Every year on the day of Shravani Amavasya, offerings are made on behalf of the Math to propitiate the God, (Shree Kshetra Devata) of the locality. The legend associated with this place is that Paingi

Maharshi after establishing his Ashram in the area which is known now as Painguin used the place under the Vatavriksha for meditation. It is further believed that the meditation under the tree enlightened this well known sage of the ancient India.

The Vatavriksha symbolically represents the spiritual movement carried on by Shri Samsthan Gokarn Partagal Math for over five hundred years. Its branches spreading over a large area are symbolic of the spreading of the message of true Dharma given by the Math, to far-off corners of the world. The aerial roots of the tree entering deep into the soil symbolise the fact that this message is deep-rooted into the minds of all disciples of the Muth.

This symbol of the spiritual movement of the Math is now well taken care of, by the authorities of the Math. The Bramhasthan is now made accesible by the motorable road. Those desiring to make offerings to Shreekshetra Devata or to get merely a glimpse of this "Miracle of Nature" can now do it without any difficulty. It has already assumed spiritual significance and has been an attraction of many a devotees and inquisitive Tourists.





# ॥ श्री ॥

  

अंक :- 23

शके १८९९
दि. ३१-३-१९७७

श्रीमत्परमहंस परिव्राजकाचार्य पदवाक्यप्रमाणपारावारपारीण यम नियमासन प्राणायाम प्रत्याहार ध्यानधारणासमाध्यष्टांग योगानुष्ठानगरिष्ठनिष्ठानादिगुरुपरंपराप्राप्त निगमागमसार श्रुतिमार्गप्रकाशक सर्वतंत्र स्वतंत्र श्रीमज्जमदग्नितनुज तपस्स्वाध्यायाद्यर्थं विनिर्मित शूर्पारक महाक्षेत्र गोमंताचल गोमतीतीरसन्निहित कुशस्थलीनगर महामठादिप्रतिष्ठापनाचार्य सकलसुरमुकुटमणिनीराजित दिव्य श्रीभवानीशंकरपादारविन्दाराधक श्रीमदात्मानन्दसरस्वतीकरकमलसंजात श्रीमत्पूर्णानन्दसरस्वत्यनुगृहीत श्रीमत्सच्चिदानन्दसरस्वती श्रीपादै :

अस्मदत्यन्तप्रेमास्पदीभूत श्रीमदुमारमणचरणारविन्द भक्तिपरायण शिष्यवर्य श्रियाविराजित राज्यमान्य राजश्री श्री संस्थान गोकर्ण पर्तगाळी जीवोत्तम मठ पंचशताब्दि महोत्सव समिति पर्तगाळी निवासिषु कृतनारायणस्मरणपूर्विकाशिषः समुल्लसन्त्वद्य शके १८९९ पिंगळ नाम संवत्सरे चैत्र शु. ११ दशी गुरु वासरावधि वर्णुग्रामे कुशलिनः स्मः भवदियानामनामयत्वमनुदिनमेधमानमाशास्महे ॥ विशेषस्तु :—

प्रस्तुत आज्ञापत्रास कारण आपले दि. २५-३-७७ चे विनंतिपत्र संस्थानीं नुकतेंच मिळालें. पर्तगाळी येथें श्री गोकर्ण पर्तगाळी जीवोत्तम मठाचा पंचशताब्दि महोत्सव एप्रिल दि. ८ ते १० पर्यंत साजरा केला जात असल्याचें व तन्निमित्त स्मरणिका प्रकाशनाचा मनोदय असल्याचें समजून फार समाधान वाटलें. धर्म व ईश्वरनिष्ठा ही सर्व मानवांच्या उत्कर्षाला कारण असल्यामुळे श्री गोकर्ण पर्तगाळी जीवोत्तम मठाची धर्मप्रसारादि कार्य करण्याची परंपरा अखंडित चालू रहावी व त्या योगें सर्व शिष्यवृंदाचें ऐहिक व पारमार्थिक कल्याण व्हावें आणि पंचशताब्दि महोत्सव व स्मरणिका प्रकाशनादि कार्य निर्विघ्नरीत्या यथासांग पार पडावें व आपणा सर्वांस दीर्घायुरारोग्य लाभून आपणा सर्वांचे निरंतर कल्याण व्हावें यद्विषयीं श्री संस्थानाराध्य दैवत श्री भवानीशंकर चरणीं प्रार्थना करून गंध प्रसाद पाठविला आहे. तरेंच संस्थान देवतेचे हा शुभाशीर्वाद आहेत सुज्ञेषु किं बहुना।

लेखन सीमा नारायणस्मरणाः





Acting President

उपराष्ट्रपति, भारत
नई देहली
VICE-PRESIDENT
INDIA
NEW DELHI

April 4, 1977.

I am glad to know that as part of the Quin-Centenary celebrations of Shree Math, a Conference of the followers of the Math will be held from the 8th April at Shree Samsthan Partagal (Goa). I send my best wishes for the success of the Conference.

(B.D. Jatti)

**Message from our**

## *Prime Minister*

Shri MORARJI DESAI

I am happy that the 500th Anniversery of Shree Samsthan Gokarn Partagali Jeevottam Math is being celebrated from the 8th April 1977.

I send my best wishes on this occasion.

*Sd- MORARJI DESAI*
*New Delhi, 4th April 1977*

1-4-1977

**D. Veerendra Heggade**
The Dharmadhikari of Dharmasthala,
**Dharmasthala** 574 216
Karnataka State

To
Shri Panduranga D. Kamat Timblo
Vice-President,
Shree Samsthan Gokarn Partagali Jeevottam Math
Partagali, GOA.

Dear Sir,

I am glad to learn that you will be celebrating the Pancha-Shatabdi Mahotsav of Shree Samsthan Gokarn Partagali Jeevottam Math on 8th, 9th and 10th April 1977.

Shree Samsthan Gokarn Math has served the needs of the society in an illustrious manner all these years.

Its traditions and its glorious heritage have been the pillars of strength of the society.

I have great respect and reverence towads H. H. Parama Poojya Guru Swami Vrindavanastha Shrimad Dwarkanath Teerth Swamiji and H. H. Vidyadhiraj Teerth Swamiji.

They are held in high esteem by all those who have had the opportunity of having their Darshan and Blessings.

Please convey my respectful Paranaams to His Holiness.

It is fitting that you propose to bring out a Souvenir to commemorate this august occasion. I send my sincere greetings and wish the celebrations all success.

I pray Lord Manjunath to shower His Choicest Blessings on you all.

Thanking you,

Yours sincerely
D. VEERENDRA HEGGADE

Phone : 3725!
3728!
No. 2, KRISHNA MENON MAR
NEW DELHI-110 01

T. A. PAI
MEMBER OF PARLIAMENT
(LOK SABHA)

April 4, 1977.

## MESSAGE

The news of the proposed 'Sneha Sammelan' being held for 3 days starting from 8th April, 1977 must prove a welcome boon and balm not only to the followers of the Gokarn Partagali Jeevotta Math, but also to the spiritual disciples spread all over the country. It is gratifying to know that this Sammelan will be conducted in the holy presence of H.H. Shrimat Vidyadhiraj Teertha Shripad Vader Swamiji. I send my best wishes for the success of the Sammelan and pray to Swamiji for his divine and merciful blessings.

(T. A. Pai)

Shri Vasantrao S. Dempo,
President,
Shree Samsthan Gokarn Partagali Jeevottam Math
Pancha-Shatabdi Mahotsav Samiti,
Goa.

९।१४७


# All India Saraswat Cultural Organisation

"Vagdevi" 369-B, Senapati Bapat Marg, Mahim, Bombay - 400 016


Chaitra Shudha Ekadashi
Saka 1899.

Respected Shri Vasantrao,

I thank you for your kind invitation in connection with the Pancha Shatabdi celebrations of Shree Samsthan Gokarn Partagali Jeevottam Math. Goa.

Myself and members of All India Saraswat Cultural Organisation hereby send their greetings, respects and reverence to the lotus feet of His Holiness Shrimad Vidhyadhiraj Teertha Vader Swamiji. As President of All India Saraswat Cultural Organisation I send the reverence of the entire Gowd Saraswat Brahmin community throughout India and abroad to the Revered Swamiji.

We are happy from the modest start made at Bhatkal in North Kanara, five hundred and two years ago by Shrimad Narayana Teertha Swamiji, the first Shreepad Vader, with no resources except his Guru's blessings and his own faith, the Shree Gokarn Partagali Jeevottam Math Samsthan soon became a potent centre of religious and cultural influence. And, through a succession of able, learned and dedicated H. H. Swamijis, the Math has made an abiding contribution to the cultivation of the religious life and to the popularisation of the great teachings of Shree Madhvacharya.

To this glorious Shree Gokarn Partagali Jeevottam Math, and to His Holiness Shrimad Vidyadhiraj Teetha Vader Swamiji, the Gowd Saraswat Brahmin Community pays its dutiful respects and prays to Shree Ramadev and Veera-Vithal, the Lords of all the worlds, forever to bestow His grace on H. H. Swamiji, for the progressive enlightenment and well-being of the Community and for the spread of the rule of Dharma throughout the world.

And at the lotus feet of H. H. Swamiji, we prostrate ourselves in reverence, and pray for blessings and for guidance, and for patient forgiveness of our errors.

With regards,

Yours sincerely,
SHANTARAM V. PIKALE
*President*

श्रीरामदेव वीर विठ्ठलो जयति



गोकर्ण पर्तगाळ जिवोत्तममठे

श्रीमाध्वमठीय

पंचशताब्दि महोत्सव समयविहित

## श्रीगुरु शुभाशंसन गीतम्

(अनुष्टुम्-वृत्तेन)

अध्यात्मतत्वविंत् श्रीमत इंदिराकांततीर्थ वत् ॥
शास्त्रचर्चा परोभूयात् कमलानाथतीर्थ वत् ॥ १ ॥
सर्वत्र समदर्शीच द्वारकानाथतीर्थ वत् ॥
विद्याधिराजः स्यात् पंचशताब्द्युत्सवशंसना ॥ २ ॥

**मराठी-समश्लोकी**

इंदिराकांत तीर्थांच्या सम अध्यात्मचिंतन ॥
कमलानाथ तीर्थांच्या परि शास्त्र विवेचन ॥ १ ॥
द्वारकानाथ तीर्थांच्या सारखें समदर्शन ॥
विद्याधिराज व्हा पंचशताब्द्युत्सविं मागणं ॥ २ ॥

**श्रीगुरुवंदनम्**

(चतुर्भाषात्मकम्)

श्रीमाध्वपीठस्थमठाधिपाय । विद्याधिराजाययतीश्वराय ॥
मरुत्शताब्द्युत्सव मंडिताय । नमोऽस्तु श्रीरामकृपाऽऽकराय ॥१॥

**मराठी-समश्लोकी**

श्रीमाध्व पीठस्थमठाधिपाला । विद्याधिराजाख्य यतीश्वराला ॥
मरुत शताब्द्युत्सव मंडिताला । प्रणाम श्रीरामकृपाऽऽकराला ॥१॥

**कोंकणी-अणकार**

श्रीमाध्व पीठस्थ मठाधिपाक । विद्याधिराजाख्य यतीश्वराक ॥
मरुत् शताब्द्युत्सव मंडिताक । प्रणाम श्रीरामकृपाऽऽकराक ॥ १ ॥

**हिंदी-अनुवाद**

श्रीमाध्व पीठस्थ मठाधिपोंके । विद्याधिराजाख्य यतीश्वरोंके ॥
मरुत् शताब्द्युत्सव मंडितोंके । प्रणाम श्रीरामकृपाऽऽकरोंके ॥ १ ॥

समारंभ दि. ८ ते १०-४-१९७७
श्रीशके १८९९ पिंगल संवत्सरे
चैत्र कृ. ९ मी शुक्रवार ते ७ मी रविवार
श्रीसंस्थान गोकर्ण पर्तगाळ जीवोत्तम मठ
मु. पर्तगाळ-गोवा.

श्रीचरणरज-रेगे कुलभूषण,
ज्यो. वि. कृष्ण हरिभट्ट रेगे,
कवळे, फोंडा-गोवा.

# श्रीमध्वाचार्य व त्यांचें तत्त्वस्वरूप

–संजय

श्रीसंस्थान गोकर्ण पर्तगाळी जीवोत्तम मठ या नात्याने आज मान्यता पावलेला मठ हा द्वैत संप्रदायाचे प्रतिनिधित्व करीत असून या संप्रदायाचे संस्थापक श्रीमध्वाचार्य होत. भक्तीला दार्शनिक सुवर्णपीठावर प्रतिष्ठित करणाऱ्या महान चिंतक भक्त आचार्यांमध्यें श्रीरामानुज यांच्या पश्चात् श्रीमध्वाचार्य यांचेच स्थान आहे. कालगणनेच्या दृष्टीने भक्त दार्शनिक श्रीभास्कराचार्य हे श्रीमध्वाचार्यांपेक्षा पुरोगामी होते. परंतु कार्य व प्रभाव विचारात घेतां श्रीमध्वाचार्य यांची ख्याती विशेष आहे. आज मध्व विचारदृष्टीचा पुरस्कार करणारे समृद्ध मठ व त्यागी विद्वान देशांत इतस्ततः विखुरलेले दिसतात. मध्वमताचे मुख्य पीठ कर्नाटक राज्यातील उडुपी शहर होय. पुरोगामी आचार्य श्रीशंकर व श्रीरामानुज यांच्या अस्त्राच्या धारेप्रमाणे तीक्ष्ण बुद्धीतून प्रस्थापित झालेल्या सिद्धांतांना आव्हान देण्याचे अवघड काम केवळ हृदयात भक्ति असलेले प्राचार्य करू शकणार नाहीत. भक्ति बरोबरच बुद्धीचीही जोड असावी लागते. हे दोन्ही सद्गुण श्रीमध्वाचार्यांमध्यें उत्कट होते. म्हणूनच आज सात शतकानंतर देखील ते असंख्य चिंतक व भाविकांचे आराध्य बनून राहिले आहेत.

माध्व संप्रदाय श्रीमध्वाचार्यांना वायुदेवाचे अवतार मानतो. त्यांच्या संबंधातील सुप्रसिद्ध श्लोकांचा भावार्थ असा आहे : व्यासादि प्राचीन मुनी व श्रीहरीच्या निरंतर ध्यानातून प्राप्त झालेले ज्ञान यांच्या जोरावर प्रतिद्वंद्वी रूपी हत्तींचे बळ, सिंह ज्याप्रमाणे उध्वस्त करतात आणि समग्र वेदांशीं संबंधित लोकांमधील अज्ञानरूपी तिमिराचा तेजस्वी सूर्याप्रमाणे ऱ्हास करतात अशा सर्वज्ञ व विख्यात मध्व आचार्यांची व्याख्या सफल सुहृदयांच्या कानांचे आभूषण बनलें आहे.

"ज्यांना कसलाच भ्रम नाही, जे कुणाकडूनच पराभूत होत नाहीत, जे जडताशून्य व निर्मळ आहेत. त्या विविध संतापांना दूर करणाऱ्या आनंदतीर्थांची मी उपासना करतो", असाहि भक्तांनी त्यांचा गौरव केला आहे.

आनंदतीर्थ, पूर्ण प्रज्ञ, अनुभरतीर्थ व शुकतीर्थ या नांवांनीही श्रीमध्वाचार्यांना ओळखलें जातें. आपल्या युग कार्याबद्दल ते सभान होते. ते स्वतःला वायुपुत्र म्हणवत व वेदादिशास्त्रांच्या उद्धारासाठी ईश्वरप्रेषित मानत. एके ठिकाणीं तर त्यांनी कोणताच संकोच न बाळगता स्वतःचा उल्लेख वायूचा तिसरा अवतार असा केला आहे. पहिला अवतार म्हणजे राम साहाय्यक हनुमानाचा, दुसरा कौरवगण संहारक भीमाचा व तिसरा अज्ञान विदारक मध्वाचा. आचार्यांनी ३७ ग्रंथ रचलेले असून त्यांमध्ये गीता ब्रह्मसूत्र व उपनिषदांवरील भाष्यांचा समावेश आहे. उडुपी येथे आपल्या सिद्धीच्या जोरावर भगवान् श्रीकृष्णाची मनमोहक मूर्ति चालवून स्वतःकडे आणली व त्यांनी तेथे विशाल व सुंदर मंदिर उभारले अशी आख्यायिका आहे. आजहि उडुपीतील श्रीकृष्ण मंदिर हे हे भाविकांचे प्रमुख आकर्षण असून गेली सात शतकें हें मंदिर मध्व प्रवृत्तीचें मुख्य केन्द्र राहिलें आहे

श्रीमध्वाचार्यांच्या जीवनकार्याचा आढावा घेणारे एक संस्कृत महाकाव्य त्यांचे समकालीन श्रीनारायण पंडिताचार्य यांनी रचलेलें आहे. सोळा सर्गातील आणि हजारांहून अधिक श्लोकांनीं भरलेलें हें महाकाव्य म्हणजे मध्व संप्रदायी सिद्धांत मीमांसक अशा रसाळ साहित्यिक शैलीतील उत्कृष्ट काव्य आहे. ग्रंथकार म्हणतात की श्रीमध्व हे उत्तम आचार्य व वैदिक तत्वाचे खरे द्रष्टे व प्रबोधक होत. श्रीमध्वाचार्यांच्या उपदेशाचा केंद्रबिंदु स्वकर्तव्यनिष्ठा व ईश्वरसमर्पण हा होय. सर्वसंग परित्यागाला ते महत्व देत नव्हते. सर्व कल्याणकारक प्रवृत्तीत व्यग्र असतानाच ईश्वरपरायण रहाणे हे श्रेष्ठ व श्रेयस्कर जीवन आहे असें ते मानत आणि अकर्मण्यतेचा ते विरोध करीत.

तत्वदृष्टीने त्यांचा सिद्धांत असा :

विश्वात तीन घटक तत्वें आहेत : परमात्मा, जीव आणि जगत्. नारायण हा परमात्म्यासाठी त्यांनी रूढ केलेला शब्द होय. नारायण म्हणजे जीवांमध्यें वास करणारा अंतर्यामी. ही तिन्ही तत्वें अविनाशी अर्थात नित्य

व एकमेकांपासून भिन्न आहेत. परंतु संपूर्ण स्वातंत्र्य केवळ नारायणाचेंच आहे. जीव आणि जगत् भिन्न असूनही त्यांवर नारायणाचे नियंत्रण आहे. समर्थपणासह विधर्माचरण केल्यानेच परमात्म्याचें प्रीतिभोजन होऊ शकते व क्लेषांपासून मुक्ति मिळते. विधिवत् पूजन, अर्चन केल्यानेच परमात्म्याचें यथार्थ ज्ञान व संतापनिवारक अनुग्रह प्राप्त होत असतो. परमात्मा हा जगताचे सर्जन , संहार, नियमन, बंधन व मुक्ति इच्छेनुसार करूं शकतो. तरी देखील जीवाचा सदाचार व त्याची भक्ति हे इच्छेचे प्रयोजक असतात. नारायण सकळ उत्तम गुणनिधान व सर्ववीध दोष अथवा त्रुटीं-पासून मुक्त आहे. आपापल्या कर्माचीं फळें मिळावीं या हेतूनें तोच जीवांना उच्च नीच योनीमध्ये जन्म देतो. जीवाची पात्रता किंवा योग्यता पाहूनच ईश्वर विविध भोग निर्माण करीत असतो. उच्च कर्मांद्वारे परमार्थ साधू पहाणाऱ्यांना, नारायणच अनुकूलता निर्माण करून मदत करीत असतो.

परमात्म्याला समजण्याचें प्रमाणित साधन म्हणजे वेद, वाल्मिकी रामायण व महाभारत ही होत. पूर्वग्रह विमुक्त या शास्त्रांचा स्वाध्याय केला पाहिजे. श्रीमध्वाचार्यांच्या मतें जगांतील सर्व भाषांतील सर्व शब्द प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षरीत्या परमात्म्याचेंच प्रतिपादन करतात. सर्वसामान्य व्यवहारांतील शब्दाचा व्यावहारिक अर्थ वस्तुरूपी असला तरी पारमार्थिक अर्थाने तो नारायणच ठरतो. वेदादिशास्त्रां परमात्म्याचे स्वरूप ज्ञान प्राप्त होऊ शकलें तरी त्याच्या प्राप्तीसाठीं ते पुरेसें नाही. परमात्मसमर्पण बुद्धीने सामाजिक व वैयक्तिक सत्कर्में करावी. व त्याच बरोबर ईश्वरार्चन करावें. तसे केल्याने आंतरबाह्य शुद्धी होऊन जीवाला परमात्म्याचा अनुग्रह प्राप्त होतो. सकाम भावाने केलेली सत्कर्मे पुण्यरूप असल्याने सुखदायी असली तरी त्या सुखाच्या आसक्तीमधून दुष्कृत्यें व पापाचा उद्‌भव संभवतो. यास्तव सत्कर्म व परमपूजा निष्काम ईश्वरसंतुष्टीसाठीच करणे योग्य होईल.

परमात्मा हा विश्वाचा सर्जक, पालक व संचालक असल्याचे शास्त्रें सांगतात. परंतु सर्जनादि प्रवृत्तीमागे परमात्म्याचा काही स्वार्थ असू शकेल काय ? श्रीमध्वाचार्य म्हणतात : परमात्मा प्रांप्त काम अर्थात सर्व कामनांपासून अलिप्त आहे. परंतु पापपुण्याचे संस्कार तसेंच भोगवासनांना क्षपित करण्याची जीवनाला संधी देण्यासाठीच प्रभूने सृष्टिरचना केली. जीवनानुभवाने तसेंच सत्पुरुषांच्या सहवासाने संसाराची दुःखमयता व भोगांची निरर्थकता ओळखून आत्मकल्याणाच्या मार्गाकडे वळण्यास जीव स्वतंत्र आहे. या स्वातंत्र्याचा सदुपयोग करावा की दुरुपयोग हे ज्याचें त्यानें ठरवावें. सदुपयोग केल्यास सर्व सुखनिधान परमात्म्याकडे तो पोचतो आणि दुरुपयोगाने सर्व दुःखनिधान पापाकडे तो वळतो. या दोन्ही अवस्थांसाठी जीव स्वतःच जबाबदार असतो.

श्रीमध्वाचार्य जीवनाचे तीन गुण सांगतात. हे तीन गुण म्हणजे सात्विक, राजस व तामस होत. सामान्यपणे ज्या गुणधर्मानिशी जीव जन्म घेतो त्या गुणधर्मातच त्याच्या जीवनाची सांगता होत असते. जीवन कामातील अनुभव आचरणावर त्याच्या जन्मांतरातील गुणांमध्ये परिवर्तन शक्य असते.

अज्ञानाचा पडदाच जीवाला. स्वतःच्या किंवा परमात्म्याच्या खऱ्या स्वरूपाबद्दल अजाण ठेवतो. सत्कर्म व भक्ति हा पडदा हळू हळू दूर करते व परमात्म्याचा अनुग्रह होताच तो अदृश्य होतो. सर्व साधनांचा मुख्य उद्देश, जीवाचे हें स्वतःविषयींचें व परमात्म्याविषयींचे अज्ञान दूर करणे हाच आहे. जो स्वतःस स्वायत्त मानतो तो देखील याच अज्ञानामुळें. आपण परमात्म्याच्या आधीन असून सारी प्रेरणा परमात्म्याकडूनच मिळते. अशी श्रद्धा असलेला जीव निरहंकारी बनतो. खरें पहातां अहंकार हाच पडदा असतो. पडदा दूर होणे म्हणजेच निरहंकारी बनणे. एकदा पडदा दूर झाला म्हणजे परमात्म्याचा साक्षात्कार होऊ शकतो व ती स्थिती प्राप्त करण्यासाठी परमात्म्याची अविच्छिन्न व अहेतुक भक्ति हा एकमेव मार्ग आहे. आत्मा व परमात्मा यांचे अबाधित ज्ञान हीच परमानंदाची स्थिति असून त्यालाच मोक्ष म्हणतात.

श्रीमध्वाचार्यांच्या मतें भगवान नारायणांची पूजा नित्यनेमाने व त्याप्रमाणे व्हावी लागते.सर्वोत्तम तत्वरूपी नारायण असला तरी त्याच्या पूजेस त्याचा परिवार महालक्ष्मी, वायु व अग्नी यांना अपरिहार्यपणे स्थान द्यावे लागेल. महालक्ष्मी ही नारायणाची अर्धांगिनी नारायणाप्रमाणेच व्यापक व सर्वज्ञ पण तरीहि नाराय-

णाच्या बाधीन आहे. स्वतंत्र नाही. इतर जीवांहून महालक्ष्मी विलक्षण व नित्यमुक्त आहे. नारायणाच्या स्वरूपाचें सर्वाधिक ज्ञान तिला आहे. नारायणाची सेवा व सान्निध्य यांतच ती आनंदित असते. तिसरे स्थान वायुदेवाचें. तो सर्वश्रेष्ठ जीव असून त्रिकालज्ञ व परमात्म्याचा परमप्रिय भक्त आहे. वायूनंतर अग्नीचे स्थान. अग्नी तेजस्तत्व असून सर्व देवांचा प्रतिनिधी बनून आहुत्यांचा स्वीकार करतो. नारायणाच्या सर्जन पालन व संहरण कार्यातील मुख्य साथी असल्याने अग्नी हा आराध्य आहे

श्रीमध्वाचार्यांनीं एकूण ३७ ग्रंथ रचले. त्यांचें ब्रह्मसूत्रावरील भाष्य सर्वोत्तम मानलें जातें. असें म्हणतात की नारायणाच्या आज्ञेवरून वायूने श्रीमध्वाचार्य यांच्या रूपाने अवतार घेतला आणि खुद्द व्यासजीच्या प्रेरणेने व्यासरचित वेदांत सूत्र—ब्रह्मसूत्राचाअर्थ यथार्थपणे रुजू करून भाष्य लिहिलें. "महाभारत–तात्पर्य" ही त्यांची आणखी एक आगळी रचना आहे.

श्रीमध्वाचार्यांच्या मतें मोक्ष मिळण्याचे एकमेव साधन म्हणजे ईश्वरानुग्रह आहे. एकाच श्लोकांत श्रीमध्वाचार्यांचे विचार नवनीत व्यक्त करतां येईल.

श्रीमन्मध्वमते हरिः परतरः सत्यं जगत् तत्वतः,
भेदा जीवगण, हरेरनुचरा नीचोच्चभावं गताः।
मुक्तिर्नैज सुखानुभूतिरमला, भक्तिश्च तत्साधनं
ह्यक्षारित्रितयं प्रमाणमखिलाम्नायैकवेद्यो हरिः ।

श्रीमध्वाचार्यांच्या सिद्धांताप्रमाणे हरि परमतत्व आहे. जगात वास्तव आहे (मिथ्या नाही.). जीव अनेक व परस्पर भिन्न आहेत. हरीच्या अनुयायांच्या तीन उच्च-नीच कोटि आहेत. आत्म्यातील निर्मळ आनंदाची अनुभूति हीच मुक्ति आहे. मुक्तीचे साधन भक्ति आहे. प्रत्यक्ष अनुमान व शब्द ही तीन यथार्थ ज्ञानाची साधनें आहेत. समग्र वेदादि शास्त्रें एकमेव हरीचेंच प्रतिपादन करतात.

---

# श्रीगोकर्ण पर्तगाळ जीवोत्तम मठ
# पीठाधीशांची परंपरा

१ श्री नारायणतीर्थ
२ श्री वासुदेवतीर्थ
३ श्री जीवोत्तमतीर्थ
४ श्री पुरुषोत्तमतीर्थ
५ श्री अणुजीवोत्तमतीर्थ
६ श्री रामचंद्रतीर्थ
७ श्री दिग्विजय रामचंद्रतीर्थ
८ श्री रघुचंद्रतीर्थ
९ श्री लक्ष्मीनारायणतीर्थ
१० श्री लक्ष्मीकांततीर्थ
११ श्री रमाकांततीर्थ
१२ श्री कमलाकांततीर्थ
१३ श्री श्रीकांततीर्थ
१४ श्री भूविजयरामचंद्रतीर्थ
१५ श्री रमानाथतीर्थ
१६ श्री लक्ष्मीनाथतीर्थ
१७ श्री आनंदतीर्थ
१८ श्री पूर्णप्रज्ञतीर्थ
१९ श्री पद्मनाभतीर्थ
२० श्री इंदिराकांततीर्थ
२१ श्री कमलानाथतीर्थ
२२ श्री द्वारकानाथतीर्थ
२३ श्री विद्याधिराजतीर्थ


2306

# श्रीगोकर्ण पर्तगाळी जीवोत्तम मठ

# पीठाधीशांची परंपरा

–विवेक

श्रीगोकर्ण पर्तगाळी जीवोत्तम मठ या नांवाने सुपरिचित असलेले आणि सर्वत्र भारतात ख्याति पावलेलें वैष्णव साम्प्रदायी धर्मपीठ गोमन्तकातील काणकोण तालुक्यातील पर्तगाळी येथें असले तरी त्या मठाची स्थापना दक्षिण कर्नाटकात भटकळ येथे झाली. श्रीमद्नारायणतीर्थ स्वामी यांच्या परमपूज्य हस्तें या विशाल वटवृक्षाचें लहानसे रोप भटकळ येथे शालिवाहन शके १३९८ या सालीं लावण्यांत आलें.

श्रीमन्मध्वाचार्यांचे द्वैतमत मानणाऱ्या अनेक मठांपैकी गोकर्ण पर्तगाळी जीवोत्तम मठ हा एक आहे. मध्वाचार्यांनी उडुपी येथे अष्टमठ स्थापन केले. त्यातील फलमार मठाचे दहावे आचार्य रामचंद्रतीर्थ हे बदरीनारायण यात्रेस गेले असतां तेथें आजारी पडले. यावेळी त्यांच्यासमवेत संन्यासाश्रमास योग्य असा गौड सारस्वत ज्ञातीतील माधव नावाचा एक ब्रम्हचारी होता. त्यास रामचंद्रतीर्थांनी संन्यास देऊन शिष्य करून घेतलें. ही घटना शके १३९८ मध्ये चैत्र शुद्ध द्वितीयेस घडली. हेच श्रीमद्नारायणतीर्थ.

आजारी स्थितींत श्रीमद्रामचंद्रतीर्थांनी श्रीनारायणतीर्थांस संन्यासाश्रम दिला तरी नंतर ते आजारातून बरे झाले आणि उरलेली सर्व यात्रा करून उडुपीला परत आले. आणि उडुपीला परत आल्यावर त्यांच्यासमोर एक प्रश्न उभा राहिला. आपल्या आजारीपणांत आणि नंतर भारतयात्रेंत ज्या (माधव) श्रीनारायणतीर्थ यांनी आपली सेवा केली त्यांस आपला उत्तराधिकारी नेमायचे की तत्पूर्वी उडुपीत नेमस्त केलेल्या श्रीविद्यानिधीतीर्थ यांना पीठाधिकार द्यायचा हा जटिल प्रश्न त्यांच्यासमोर उभा राहिला. त्यांतच नारायणतीर्थ हे सारस्वत ब्राम्हण होते. आणि उडुपी मठाचे शिष्य हे द्रविड ब्राम्हण होते. आणि त्या मठाची परंपराहि द्रविड ब्राम्हणांचीच. शेवटी परंपरेला अनुसरूनच रामचंद्रतीर्थांनी हा प्रश्न सोडविला. विद्यानिधीतीर्थ यांस फलमार मठाचे उत्तराधिकारी नेमलें. उडुपी मठाची परंपरा ही द्रविड ब्राम्हणांची असल्याने सारस्वत यतीस पट्टाभिषेक करूं नये असा ज्ञातीचा निर्णय झाल्यावर श्रीविद्यानिधीतीर्थांस उत्तराधिकारी म्हणून नियुक्त केलें गेलें असेहि या संदर्भात सांगण्यात येतें. कसेंहि असलें तरीआपल्या परमप्रिय शिष्यास–श्रीनारायणतीर्थांस–रामचंद्रतीर्थ उडुपी मठाचे उत्तराधिकारी करूं शकले नाहींत. व त्यांनीं नारायणतीर्थांना भटकळ येथें जाऊन स्वतंत्र मठस्थापना करायची आज्ञा केली. श्रीनारायणतीर्थ हे सारस्वत ज्ञातीतील असल्याने सारस्वत समाजाचे संघटन करून त्यांना धार्मिक व आध्यात्मिक मार्गदर्शन करण्याची आज्ञा केली. फलमार मठाप्रमाणेंच ह्या नव्या शिष्यालाहि मानपान, बिरुदावलीहि त्यांनी दिली. धर्मप्रसारणाचे कार्य करतांना कसलीहि अडचण आल्यास आपली मदत मागण्यास सांगून रामचंद्रतीर्थांनी नारायणतीर्थांस वीर रामदेवाची मूर्ति देऊन आशीर्वचन–पुरस्सर निरोप दिला. तत्पूर्वी नारायणतीर्थांना पट्टाभिषेकहि करण्यांत आला.

## भटकळ येथें मठस्थापना

गुरुंची आज्ञा झाल्याप्रमाणें श्रीनारायणतीर्थ भटकळला आले आणि मठस्थापनेच्या तयारीला लागले. दक्षिण व उत्तर कर्नाटक जिल्ह्यांतील सारस्वत समाजालाहि धर्मगुरुंची आणि एका धर्मपीठाची गरज होतीच. त्यांनी तनमनधन ओतून त्यांस मदत केली. आणि त्यांच्या सहाय्याने नारायणतीर्थांनी भटकळ येथे श्रीशके १३९८ दुर्मुख नाम संवत्सरांत स्वकीय मठाची–वैष्णव मठाची–स्थापना केली.

मठस्थापनेनंतर स्वामीजींनी द्वैतमतवादी वैष्णव संप्रदायाच्या प्रचारकार्यास आरंभ केला. उत्तर कर्नाटकांत भटकळपासून दक्षिणेस उडुपी, कुंदापुर, मंगळूर, कन्नानोर कालिकत, त्रावणकोर, कोचीनपर्यंत स्वधर्माचा प्रचार

आणि प्रसार केला. नंतर गोमतकातहि सासष्टी, बारदेश भागांत संचार करून द्वैतमताचा प्रसार केला. या धर्मप्रसाराच्या कार्यातील एक विशेष म्हणजे या कामीं कुणावर जबरदस्ती झाली नाहीं. जें झालें ते स्वेच्छेने. यावेळी स्मार्त आणि वैष्णव असे दोन संप्रदाय होते. स्मार्त हे शिवाचे उपासक होते तर वैष्णव हे विष्णूचे. हे दोन्ही संप्रदाय भिन्न आहेत असे दर्शविणारी वेगवेगळीं चिन्हेंहि त्यावेळीं प्रसारांत होती. वैष्णव संप्रदायी लोक स्नानानंतर गोपीचंदनाने कपाळावर उभे (गंध) नाम लावून दोन्ही कानशिलांवर शंख, चक्रादि श्रीविष्णूच्या आयुधांची मुद्रा उमटवीत. तर स्मार्त संप्रदाय आडवें भस्म (गंध) लावीत. संप्रदाय भिन्न असले तरी दोन्ही संप्रदायात संघर्ष असा नव्हताच. आणि द्वैतमतावर आधारलेल्या वैष्णव संप्रदायाचा प्रसार होतांनाही स्मार्त संप्रदायाशीं कोणत्याच प्रकारचा वांकडेपणा आला नाही.

भटकळ येथे स्थापन झालेलें हें धर्मपीठ दाक्षिणात्य सारस्वत समाजाचे पहिलें गुरुपीठ होय. सारस्वत समाजांत नंतर कैवल्यपूर, चित्रापूर, काशी, दाभोळ वगैरे गुरुपीठें स्थापलीं गेली. परंतु भटकळ येथें स्थापन झालेलें व नंतर श्रीगोकर्ण पर्तगाळी जीवोत्तम मठ म्हणून ख्याति पावलेले हें सारस्वत ज्ञातीतील प्रथम धर्मपीठ. इतर धर्मपीठें हीं ह्या नंतरची. त्या दृष्टीनेही भटकळ येथे सारस्वत यतिवर्यांनी सारस्वत ब्राम्हणांसाठीं स्थापन केलेलें हें पहिले गुरुपीठ म्हणून त्याचे वैशिष्ट्य सांगण्यांत येते. भटकळला मठस्थापन करणाऱ्या श्रीनारायणतीर्थांची समाधी भटकळ येथेंच गोपीनाथ नदीच्या कांठीं आहे.

## श्रीवासुदेवतीर्थ

श्रीनारायणतीर्थांनंतर त्यांचे शिष्य श्रीवासुदेवतीर्थ यांना पट्टाभिषेक करण्यांत आला. त्यांची कारकीर्द अगदी अल्प ठरली. त्यांनी शके १४३९ माघ शुद्ध ४ ला श्रीजीवोत्तमतीर्थ यांना आश्रम देऊन स्वत: तीर्थाटनास गेले. तीर्थाटनास असतांनाच शके १४३९ किंवा १४४० मध्यें भीमातीरीं त्यांनी समाधी घेतली. या वासुदेवतीर्थांना लोक तंगळवडेर या नावांनेहि ओळखत.

श्रीवासुदेवतीर्थांचे शिष्य श्रीजीवोत्तमतीर्थ यांची कारकीर्द फारच उज्वल होती. ह्या स्वामीजींनी ह्या मठासाठीं इतके अपरिमित कार्य केलें कीं त्याचा ठसा आजहि मठामागच्या बिरुदावलींत दिसून येतो. जीवोत्तमतीर्थांनी श्रीक्षेत्र गोकर्ण येथेही मठ स्थापन केला. आणि भटकळ येथें श्रीनारायणतीर्थांनी स्थापन केलेल्या मठाला श्रीगोकर्ण मठ हें नाव प्राप्त झालें. तद्वतच ह्या स्वामीजींच्या अविस्मरणीय कारकीर्दीची आणि अपरंपार मेहनतीची आठवण म्हणूनच की काय श्रीगोकर्ण पर्तगाळी जीवोत्तम ह्या मठाच्या बिरुदावळींत त्यांचें नांव अमर होऊन राहिलें.

## श्रीजीवोत्तमतीर्थ–तपस्वी कारकीर्द

श्रीजीवोत्तमतीर्थ हे मठाचे तिसरे आचार्य. ते मूळ बसरूरचे, श्रीवासुदेवतीर्थांनी त्यांना शके १४३९ मध्यें माघ शुद्ध १४ शी दिनीं आश्रम दिला. जीवोत्तमतीर्थांची सारी कारकीर्दच असामान्य होती. त्यांचें सारे जीवनच तपस्वी आणि यशस्वीही होतें. श्रीमन्मध्वाचार्यांप्रमाणेच त्यांनीही लोकांना आपलें ज्ञान आणि योग सामर्थ्याचा प्रत्यय आणून दिला. श्रीमध्वाचार्यांप्रमाणेंच जीवोत्तमतीर्थांनीहि तीर्थयात्रेच्या निमित्तानें भारतभर भ्रमण केलें होतें. तीर्थयात्रेला जातांना त्यांचा मुक्काम एकदां विजापूर गांवी पडला होता. विजापुरचा बादशहा अली आदिलशहा हा मुसलमान असला तरी त्याच्या दरबारात हिंदु सरदारांचा भरणा होता. त्यांच्या आग्रहावरून सुलतानानें श्रीजीवोत्तमतीर्थांचा योग्य सत्कार केला. परंतु त्याचबरोबर ह्या यतीची परीक्षा पहावी म्हणून त्यांना कांही भेटवस्तू पाठविल्या त्यांत मांसाचाहि समावेश केला. स्वामींनी मांस पाहतांच त्यावर आपल्या कमंडलूंतले पाणी शिंपडलें. आणि त्या मांसाचे सुवासिक फुलांत रूपांतर करून ती फुलें परत बादशहाला प्रसाद म्हणून पाठवून दिली आणि आपल्या योगसामर्थ्याची प्रचीति बादशहाला पटवून दिली. आचार्यांनी दिलेला प्रसाद भक्षण केल्यानें बादशहाला पुत्रप्राप्ति होऊन राज्याला वारसही मिळाला. आणि स्वामीजींच्या योगसामर्थ्यानें प्रभावित होऊन बादशहानें स्वामीजींचा पुनश्च सत्कार करून श्वेतछत्र, श्वेतचामरे, शिबिका, अबदागीर वगैरे अर्पण करून स्वामीजींचा सन्मान केला.

उत्तर दिशेच्या यात्रेच्या वेळीं स्वामीजी शिला नदीत स्नानाला गेल्यावेळी त्यांना तीन धातुमूर्तींचाहि लाभ झाला. याच या दिग्विजय विठ्ठल, भूविजय विठ्ठल आणि वीर विठ्ठल मूर्ती होत. याच शिला नदीकांठी स्वामीजींचा मुक्काम असल्यावेळी अष्ट-मठान्तर्गत सोदे मठाचे आचार्य श्रीवादिराजतीर्थ हेहि तीर्थयात्रेनिमित्त तेथे पोंचले असतां उभय स्वामीजींची भेट घडली.

याच मुक्कामात श्रीजीवोत्तमतीर्थांनी महाप्रस्थान करून जीवितयात्रा संपवून परमेश्वर प्राप्तीची इच्छा धरून अनशन व्रतास आरंभ केला. आहार घेण्याचें बंद केलें. त्यावेळी अशी आकाशवाणी झाली की, "हे यति-श्रेष्ठा. या जन्मात मी तुला भेटूं शकणार नाही. यास्तव तूं अनशन व्रत सोडून दे. देह कष्टवूं नकोस. हें व्रत मला समर्पण कर. तुझ्या अवतारसमाप्तीच्या वेळी तुला न्यायला विमान येईल. त्यांत बसून तूं जीवनमुक्तांच्या सभेंत ये. तेथें तुला माझें दर्शन घडेल."

भगवंताच्या या आदेशानुसार जीवोत्तमतीर्थांनी अन-शनव्रत सोडून हिमालयापासून परत फिरले. मथुरा वृन्दावनांत येऊन त्यांनी गोपाळकृष्णाचे दर्शन घेतलें. वाटेंत पंढरपूर येथे येऊन विठोबाचें दर्शन घेऊन ते तेथून थेट गोमंतकांत आले. गोमंतकांतील काणकोण तालुक्यांतील पैंगीण गांवांत असलेल्या परशुराम मूर्तीचे दर्शन घेऊन ते कारवार मार्गे श्रीक्षेत्र गोकर्ण येथे आले.

## दिग्विजय विठ्ठलाची प्रतिष्ठापना

गोकर्ण क्षेत्रीं आल्यावर तेथे कोटितीर्थानजीक त्यांनी एक उपमठ बांधला आणि त्यांना शिला नदीत सांपडलेल्या तीन मूर्तींतील भूविजय विठ्ठल मूर्तीची स्थापना केली. नंतर दुसरा उपमठ बसरूर येथे बांधून त्यांत दुसऱ्या दिग्विजय विठ्ठलाची मूर्ति स्थापली आणि तिसरी वीर विठ्ठलाची मूर्ति स्वामीजींनी आपली इष्टदेवता मानून स्वतःच्या देव्हाऱ्यांत ठेवली. या मूर्तीची पूजा ते स्वतः करूं लागले. आणि तेव्हांपासूनच आज-तागायत या वीर विठ्ठल मूर्तीची पूजा स्वतः पीठा-धिशांनीच करायची अशी प्रथा पडली. स्वामीजींशिवाय दुसरा कोणीच या मूर्तीची पूजा करूं शकत नाही किंवा मूर्तीना स्पर्शही करूं शकत नाहीं. स्वामीजी गंभीर आजारी असले तरीहि स्नान करून या मूर्तीची पूजाअर्चा त्यानाच करावी लागते आणि आजतागायत ती प्रथा चालू आहे. कधीहि त्यात खंड पडलेला नाही.

भटकळ मठांत परत आल्यावर श्रीजीवोत्तमतीर्थांनी एका मुकुलोत्पन्न ब्रम्हचाऱ्याला शिष्याश्रम दिला. पुरुषोत्तमतीर्थ असे नांव या शिष्यास देऊन आणि वीर विठ्ठलाची पूजाअर्चा करायची जबाबदारी त्याच्यावर सोंपवून ते पुन्हां तीर्थयात्रेला रवाना झाले. तिरुपती येथे श्रीव्यंकटेश्वराचें दर्शन घेऊन श्रीशैलास गेले. कांची येथे जाऊन वरदराजाचेही दर्शन घेतल्या-वर ते रामेश्वराला गेले. रामेश्वरम् येथे भगवान श्रीरामचंद्रांनी स्वतः स्थापन केलेल्या रामेश्वराचें दर्शन घेऊन ते उडुपीला आले. उडुपी येथें श्रीमध्वाचार्यांनीं स्थापन केलेल्या श्रीकृष्णाचे दर्शन घेऊन ते भटकळला परत आले. तीर्थाटनाहून ते परत आले तरी त्यांनी मठाची सूत्रें आपल्या हातांत घेतली नाहीत. सारा कारभार श्रीपुरुषोत्तमतीर्थांकडे सोंपवून मठात गर्भ-गृहाच्या बाहेर स्थापन केलेल्या विठ्ठलाची उपासना करीत ते तेथेच राहिले.

विठ्ठलभक्तींत कालक्रमणा करीत असतांनाच त्यांना भगवंताची आज्ञा झाली. शिला नदीच्या तीरीं अनशन व्रतास बसले असतां भगवंतांनी सांगितल्याप्रमाणे त्यांना विमान पाठवून दिलें. समाधिकाळ जवळ आलेला कळताच त्यांनी नश्वर देहाचा त्याग केला आणि त्यांचा आत्मा वैकुंठास गेला.

यावेळी सोदे मठाचे वादिराजतीर्थ हे उडुपी येथे श्रीकृष्ण मूर्तीला मंगलारती करीत होते. त्यांना अंतर्ज्ञा-नाने जीवोत्तमतीर्थांचा आत्मा वैकुंठाला जात अस-ल्याचें कळलें तेव्हां श्रीकृष्णाला आरती करतांकरतांच त्यांनी ती आरती आकाशाच्या दिशेनेहि ओवाळली. हें पाहून आरतीला जमलेल्या लोकांना आश्चर्य वाटलें. आणि त्यांनी स्वामीजींना त्याबद्दल विचारलें असतां त्यांनी त्यांना जीवोत्तमतीर्थांचे चरित्र आणि त्यांची महति सांगून ते जीवनमुक्त होऊन वैकुंटाला जात असल्याचें सांगितलें.

## महान् विभूति

श्रीजीवोत्तमतीर्थांचा अध्यात्मविद्येतील अधिकार फार मोठा होता. त्यांची ज्ञानसाधना आणि योगसाधनाही

महान होती. देहावर आणि मनावर त्यांचा विक्षलण ताबा होता. मठाच्या परंपरेत ती फार मोठी विभूति होऊन गेली. तीर्थाटन करून पुण्य संपादन करतांनाच त्यांनी स्वधर्माचा प्रसार केला. गोकर्ण, बसरूर येथे मठस्थापना करून भटकळ येथील मुख्य मठाचाहि विस्तार केला. हे त्यांचे कार्य अतुलनीय आहे. आपल्या तीर्थयात्रेवर त्यांनी 'तीर्थावळ' नांवाचे एक काव्यहि लिहिलें आहे.

श्रीजीवोत्तमतीर्थांच्या महानिर्वाणानंतर श्रीपुरुषोत्तमतीर्थ यांना शके १५१० या वर्षी भाद्रपद महिन्यांत पट्टाभिषेक करण्यांत आला. हे स्वामीजी कर्मकांडाबद्दल फारच जागरूक होते. नित्यनैमित्तिक कर्मांचा ऱ्हास होऊं नये व श्रौतस्मार्त कर्मे स्वकीय ब्राम्हणवर्गाने विधिपूर्वक करावीं म्हणून त्यांनी 'कर्मसिद्धांत' हा ग्रंथ लिहिला. तसेच 'संन्यासपद्धती' ह्या दुसऱ्याहि ग्रंथाची त्यांनी निर्मिती केली. श्रीगोकर्ण क्षेत्रींच त्यांनी समाधी घेतली. मठाचे दुसरे आचार्य वासुदेवतीर्थ यांच्याप्रमाणेच पुरुषोत्तमतीर्थांचीही कारकीर्द फारच अल्प ठरली. गुरुपीठावर आरोहण केल्यावर लवकरच म्हणजे मार्गशीर्ष कृष्ण द्वितिया रोजीं ते समाधिस्त झाले.

## अणुजीवोत्तमतीर्थ

पुरुषोत्तमतीर्थानंतर त्यांचे शिष्य अणुजीवोत्तमतीर्थांना पट्टाभिषेक झाला. १५१० ते १५६० अशी ५० वर्षे त्यांनी मठाचा कारभार पाहिला. अणुजीवोत्तमतीर्थांच्या कारकीर्दीतील महत्वाचे कार्य म्हणजे त्यांनी गोमंतकातील डिचोली येथे मठ स्थापला हें होय. परंपरेतला हा चौथा मठ होय. जीवोत्तमतीर्थांप्रमाणेच मठाची स्थापना करून या स्वामीजींनी आपलें अणुजीवोत्तमतीर्थ हे नांव सार्थ केलें.

या काळांत बारदेश, तिसवाडी, साष्टी या प्रदेशांत पोर्तुगीजांची सत्ता चालत होती. या तीनहि ठिकाणचे लोक पोर्तुगीजांच्या धर्मच्छलामुळें पळून जाऊन त्यावेळच्या इतर भागात म्हणजे पोर्तुगीजांना वेढून राहिलेल्या इतर प्रदेशांत जाऊन राहिले होते. त्यांच्या सहाय्याने अणुजीवोत्तमतीर्थांनी डिचोली येथे मठ बांधला. गोमंतकांत त्यांनी वैष्णव संप्रदायाचा खूप प्रसार केला. हे स्वामीजी सुमारे पन्नास वर्षांइतक्या दीर्घ काळात गोकर्ण मठाच्या गादीवर होते. त्यांतला त्यांचा बराचसा काळ गोव्यात गेला. डिचोली मठांतहि त्यांचें वास्तव्य होई. इथेच त्यांनी समाधी घेतली.

## युगप्रवर्तक रामचंद्रतीर्थ

श्रीगोकर्ण मठाचे सहावे आचार्य श्रीरामचंद्रतीर्थ यांना अणुजीवोत्तमतीर्थांनी शके १५४९ प्रभव संवत्सरीं कार्तिक शुद्ध ९ मीला आश्रम दिला. शके १५६० मध्यें अणुजीवोत्तमतीर्थ समाधिस्त झाल्यानंतर त्यांस पट्टाभिषेक झाला. सत्तावीस वर्षे त्यांनी संस्थानाचा कारभार पाहिला. संस्थानाविषयीं सांप्रदायांतच नव्हे तर इतरांतहि प्रेम व आदर उत्पन्न केला. गोमंतकांतील पर्तगाळी मठाची स्थापना हे त्यांच्या हयातींतील युगप्रवर्तक कार्य म्हणावे लागेल. श्रीमध्वाचार्यांनी द्वैतमतवादी वैष्णव संप्रदायाची मुहूर्तमेढ रोवली. नारायणतीर्थांनी सारस्वतासाठीं स्वतंत्र मठ स्थापन केला, ह्या दोन्ही घटना घडल्या कर्नाटकांत. श्रीमन्नारायनतीर्थ यांनीं आणि त्यांच्या नंतरच्या आचार्यांनी द्वैतमताचा पुरस्कार केला तो याच कानडी मुलखांत. परंतु सारस्वतांची केन्द्रभूमि म्हणून ज्या प्रदेशाला ओळखण्यांत येते त्या गोमंतक प्रदेशांत मठ स्थापून, इतकेंच नव्हे तर ज्या पर्तगाळ मठालाच पुढे मुख्य पीठाचे महत्व प्राप्त झालें त्या पर्तगाळ येथील मठस्थापनेच्या कार्याला युगप्रवर्तक कार्यच म्हणावे लागेल. मठाच्या इतिहासांत या घटनेला तोड नाहीं.

गोमंतक ही परशुराम भूमि म्हणून ओळखली जाते. सतरा वेळां पृथ्वी निःक्षत्रिय केल्यानंतर जिंकलेल्या भूमीचे ब्राम्हणांना दान करून भगवान परशुरामांनी गोमंतकाच्या पूर्व दिशेला असलेल्या सह्य पर्वतावरून अरबी समुद्रांत बाण मारून नवी भूमी बनविली. तीच ही गोमंतक भूमि. सारस्वत प्रदेशाहून ब्राम्हणकुळें आणवून त्यानें गोमंतकांत यज्ञ केला आणि तो गोमंतकांतच राहिला अशी आख्यायिका आहे. परशुरामाची मूर्ति आहे तीहि याच गोमंतक प्रदेशांतील काणकोण तालुक्यांतील पैंगीण गांवीं. हा गांवहि पर्तगाळ गांवाहून जवळच आहे. या परशुरामभूमींत मठस्थापना करून रामचंद्रतीर्थांनी वैष्णव धर्माची पताका आणखी उंचावली. ही घटना सुवर्णाक्षरांनी लिहून ठेवण्यासारखी आहे. या घटनेपासूनच श्रीगोकर्ण पर्तगाळी जीवोत्तम मठाच्या दैदिप्यमान कारकीर्दीला आरंभ झाला असें म्हटल्यास तें मुळींच अतिशयोक्तीचें ठरूं नये. पर्तगाळी येथें मठ स्थापना झाली ती दैवी आदेशानेंच.

श्रीरामचंद्रतीर्थ स्वामीजींना गोकर्ण येथे सांप्रतच्या

मठानजीक भूगर्भांत दैवी आदेशानुसार खोदकाम करीत असताना श्रीराम, लक्ष्मण, सीता व हनुमन्त अशा चार मूर्ती मिळाल्या. या मूर्तींची स्थापना कुठें करावी या विचारात असतांना स्वामीजीस असा दृष्टांत झाला की "ह्या मूर्ती घेऊन उत्तर दिशेला जावें. मूर्तिवाहकांना जियें त्या मूर्ती जड झाल्या असें वाटेल तियें त्यांची स्थापना करावी." दृष्टांतानुसार मूर्ति घेऊन स्वामीजी लगेच उत्तर दिशेला निघाले. गोकर्णहून कारवार-मार्गे माशे गांवाहून पैंगीण गांवी स्वामीजींचे आगमन झालें असतां शिलामूर्ती जड वाटूं लागल्या. आदेशा-प्रमाणें तियें त्या मूर्तींची स्थापना करायला हवी होती. परंतु शोध घेतला असतां मठ वा मंदिर बांधण्याच्या दृष्टीने ती जागा गैरसोयीची होती. मुख्य म्हणजे पाण्याची सोय नव्हती. यामुळें स्वामीजींच्यापुढें गहन प्रश्न उभा राहिला.

त्याच रात्रीं स्वामीजींना परत दृष्टान्त झाला. "उद्यां पहाटे मुक्कामाच्या ठिकाणीं एक गाय येईल. तिची पूजा करून तिलाच योग्य जागा दाखविण्याची विनंती करावी. तीच मार्गदर्शन करील. जियें ती दुग्धधारा सोडील तिथे त्या मूर्तींची स्थापना करावी."

स्वामीजी पहाटे जागे झाले तर समोर धेनु उभी. तिची पूजा करून व साष्टांग दंडवत घालून मूर्तीस्थाप-नेची जागा दाखविण्याची स्वामीजींनी तिला विनंती केली. त्याबरोबर गाय रानेंवनें तुडवीत उत्तर दिशेला निघाली. मागून मूर्ती घेऊन स्वामीजी निघाले. कुशावती नदीच्या पवित्र, रम्य भूमींत पोंहोचतांच गायीने एका ठिकाणीं दुग्धधारा सोडल्या. राम, लक्ष्मण व सीता या तीन मूर्ती जड झाल्या. या तिन्ही मूर्तींची स्थापना या ठिकाणीं करण्याचा स्वामीजींनी संकल्प केला. गाय पुन्हां चालू लागली. रानावनांतून डोंगर-दऱ्या तुडवीत गाय चालूं लागली. मागे परिवारासह आचार्य. ऋषिवन किंवा हल्लीचें रिवण या गांवी येऊन गाय परत उभी राहिली आणि तिला पुन्हा पान्हा फुटला. हनुमान मूर्ति जड झाली. हनुमंताची स्थापना करण्यासाठी जागा निश्चित झाली. नंतर स्वामीजींनीं या दोन्ही ठिकाणीं मठ व मंदिरें बांधून मूर्तींची स्थापना केली.

## श्रीराम हाच ग्रामदेव

पोर्तुगीजांच्या छळाला कंटाळून सारस्वत जन्म-भूमीचा त्याग करून निघाले. त्यांतील काही कुटुंबें हल्लीच्या काणकोण तालुक्यांत म्हणजे त्या वेळच्या शिवेश्वर भागांत स्थायिक झाली. त्यांची पर्तगाळ येथील मठस्थापनेच्या कार्यात स्वामीजींना फार मदत झाली. पर्तगाळी येथें श्रीराममूर्तींच्या या प्रतिष्ठापनेची घटना शके १५७८ म्हणजे इ. स. १६५६ मध्यें घडली. काणकोण महालांतील ही सारस्वत कुटुंबें त्यावेळी श्रीरामालाच आपला ग्रामदेव मानून त्याला भजूं लागली. स्वामीजींनीहि त्यांना आनंदाने तशी परवानगी दिली. तिथले उत्सवहि याच सारस्वतांच्या वर्गणीतून होऊं लागले. पूजाअर्चा, नैवेद्य वगैरेही व्यवस्था त्यांनी प्रथम कांही वर्षें केली.

पर्तगाळ येथे मठस्थापना केली तरी श्रीरामचंद्रतीर्थांचा कायम मुक्काम मात्र तियें नव्हता. चातुर्मास प्रसंगीं किंवा उत्सवाच्या वेळी ते पर्तगाळी येथें येत. रामनवमी उत्सवासाठीं मात्र ते प्रतिवर्षी पर्तगाळीला येत.

श्रीरामचंद्रतीर्थ यांचा मुक्काम पर्तगाळीला विशेष होत नसला तरी रिवण येथें हनुमान मूर्ति स्थापन केली होती तेथें मात्र त्यांचा बराच काळ मुक्काम असे. श्रीरामाप्रमाणेंच त्याचा भक्त हनुमंतावर स्वामीजींची भक्ति होती.

## इतिहासाची पुनरावृत्ती

इतिहासाची पुनरावृत्ती होते ती अशी. अद्वैतमताचें खंडन करणारे श्रीमन्मध्वाचार्य यांनी उडुपी येथे अष्टमठ स्थापले त्याचप्रमाणें श्रीराम व श्रीकृष्ण यांच्या मूर्तिही स्थापल्या. आणि त्यांच्याच परंपरेतील श्रीरामचंद्रतीर्थ यांच्यापासून संन्यासदीक्षा आणि धर्मप्रसाराची प्रेरणा मिळालेल्या श्रीमन्नारायणतीर्थ स्वामीजींनी स्थापिलेल्या भटकळ मठाचा विस्तार होऊन परशुरामभूमीतील पर्तगाळी येथें स्थापलेल्या मठांत श्रीराम व श्रीवीर-विठ्ठल या मूर्तींची स्थापना होऊन या मठाची यशोगाथा अष्टमठांइतकीच किंबहुना त्याहून जास्तच उंचावली.

यापुढील काळांत गोकर्ण आणि भटकळ येथील मठाची महति मागें पडून वैष्णवसंप्रदायी धर्मपीठाचें महत्व पर्तगाळी येथील मठाला मिळाले. हेंच पीठ मुख्यपीठ मानलें जाऊं लागलें.

श्रीरामचंद्रतीर्थ वृन्दावनस्थ झाल्यानंतर त्यांचे शिष्य श्रीदिग्विजय रामचंद्रतीर्थ यांना पट्टाभिषेक

झाला. त्यांचे वास्तव्य बहुतेक रिवण येथील मठातच असे. परंतु नंतर ते पर्तगाळी मठांत येऊन राहूं लागले. आणि रघुचंद्रतीर्थ या शिष्यास त्यांनी आश्रय दिला. पर्तगाळी मठांत आश्रम देण्याचा हा पहिलाच समारंभ. पर्तगाळी मठांत श्रीराममूर्तीची स्थापना झाली आणि रामनवमीचा उत्सवही सुरू झाला. ह्या उत्सवासाठीं श्रीरामचंद्रतीर्थांनी एक मोठा रथ तयार करून घेतला होता. रामनवमीच्या रात्री या रथांतून राममूर्तीची मिरवणूक काढीत, तसेच रामनवमीचा उत्सव फक्त रामनवमीपुरताच न उरतां तो पंचमीपासून सुरू होऊ लागला. आणि गरूडपूजन, ध्वजारोहण, दंडबाळी, होमहवन इत्यादि कार्यक्रमांचीही या उत्सवाला जोड मिळाली. कांहीं वर्षांतच या उत्सवाची ख्याति आसपासच्या भागांत पसरली आणि दक्षिण कर्नाटकापर्यंतचा सारा शिष्यगण उत्सवासाठी पर्तगाळी मठांत जमू लागला.

## रामनवमी उत्सव

रामनवमीचा उत्सव पर्तगाळी मठांत मोठ्या प्रमाणावर साजरा होतो आणि उत्तरोत्तर मठाची महति वाढते आहे हे पाहून सौदे मठाधिपतींना त्याचें वैषम्य वाटू लागलें. तशांतच दोन्ही मठांत एका गांवाच्या वतनावरून वाद चालू होता आणि त्याचा निकाल पर्तगाळ मठाच्या बाजूने लागला होता. याविषयीही वैषम्य वाटून एका वर्षाच्या रामनवमीच्या उत्सवाच्या दिवशी सोदे मठाधिपतींनीं मंत्रबळाने आपल्या अंकित झालेल्या नारायण भूताला–एका पिशाच्च योनीतील सेवकाला–पर्तगाळी येथील उत्सवात अपशकून करण्यास पाठवून दिले.

रामनवमीचा उत्सव रंगात आला होता. उत्सव मूर्तीची महारथातून मिरवणूक निघाली होती. वाद्य नादांत मंत्रघोषांत आणि 'पुंडलीक वरदे हरि विठ्ठल'च्या गजरांत भक्तगण रथ ओढीत होते. उत्साहांत रथ डोलत डोलत मुख्यप्राणाच्या जुडाकडे चालला होता अकस्मात काय घडलें कुणालाच समजलें नाहीं. रथ. चालायचा बंद झाला. 'ओढा ओढा' च्या गजरांत लोक रथ ओढीत होते. रथाच्या सहाहि दोरांना धरून भक्तगण शक्तीची शिकस्त करीत होते पण रथ मुळीं हलायलाच तयार नव्हता. उत्सवाला जमलेल्यांनी खाली मठांत जाऊन ताबडतोब ही वार्ता स्वामीजींच्या कानावर घातली. दिग्विजय रामचंद्रतीर्थ उत्सवाच्या पुढील कार्यक्रमाची रूपरेषा आंखण्यांत गढून गेले होते. आणि इतक्यांत रथ थांबून राहिल्याची कटुवार्ता त्यांच्या कानावर पडली. क्षणभर मन अंतर्मुख करून पाहिलें. आणि सारा प्रकार त्यांच्या लक्षांत आला. ताबडतोब ते उठले आणि तिथेंच ठेवलेला एक नारळ घेऊन ते रथबिदीकडे आले. रथाजवळ येऊन योगबळानें त्यांनी नारायण भूतास आपल्या जवळच्या नारळांत विलीन होण्यास भाग पाडलें आणि तो नारळ त्यांनी मुख्य प्राणाच्या (मारूतीच्या) घुडाच्या पायाजवळ लांभित केला.

तेव्हांपासून महारथ मुख्यप्राणाच्या घुडाजवळ पोंहोचतांच तेलांत भिजवलेली दोन लांबलांब वस्त्रें घुडावरून खाली सोडून जाळलीं जातात. शिवाय भूतराजास नारळाचा नैवद्यही अर्पण केला जातो. इतर उत्सवाच्या वेळी पालखी घुडाजवळ आली की मुख्यप्राणास आणि भुतराजास नारळाचा नैवेद्य दाखविला जातो.

श्रीरघुचंद्रतीर्थ ह्या परंपरेतील आठव्या स्वामीजीस संन्यासदीक्षा देऊन दिग्विजय रामचंद्रतीर्थ अकोल्यास गेले. तेथेंच त्यांचे महानिर्वाण झालें. रामचंद्रतीर्थांचा एक शिष्य श्रीसंयमींद्रतीर्थ ह्यांचा गुरुशीं कांही वाद होऊन तो काशीस निघून गेला. आणि त्याने तेथेंच एक काशीमठ किंवा कांचीमठ नांवाच्या दुसऱ्या मठाची स्थापना केली. दुसरा शिष्य श्री लक्ष्मीनारायण यांचे हवाली मठाचा कारभार करून नंतर रघुचंद्रतीर्थ होनावर येथे जाऊन राहिले आणि तेथेंच ते समाधिस्त झाले. त्यांनी अल्पकाळच मठाचा कारभार केला. या अल्पकाळांतहि त्यांनी तीन वेळां गया यात्रा केली. अशा एका यात्रेच्या वेळीं त्यांनी काशीत एक मठ उभारण्यासाठीं जागा खरेदी केली. ही घटना शके १५९२ मध्यें घडली.

## राणीकडून आदरसत्कार

त्यांच्या नंतर श्रीलक्ष्मीनारायणतीर्थांनी शके १६०१ पासून मठाच्या कारभार पहायला सुरवात केली. या स्वामीजींनी मठाच्या कारभारांत खूपच सुधारणा केल्या. कांही जमिनीही घेतल्या आणि मठाचें उत्पन्न वाढवलें. ठिकठिकाणच्या मठांचा जीर्णोद्धारहि केला. शिष्य-

स्वीकार केल्यानंतर त्यांनी तीर्थयात्राही केल्या. धनुष्कोडी रामेश्वर, तिरुपती वगैरे पुण्यक्षेत्रांचे दर्शन घेतघेत ते केळदी राज्यात आले. त्यावेळी तेथे राणी चेन्नाम्मा राज्य करीत होत्या. राणीने स्वामीजींचा आदरसत्कार करून ब्राम्हणांकरवी त्यांची पादपूजा केली. श्वेतछत्र, चामरे, शमिधा, शंख व शिबिका देऊन त्यांचा सन्मान केला. तिथून ते बसरूर भटकळ मार्गे गोकर्णला परत आले. नंतर पुन्हां आचार्य तीर्थयात्रेस गेले. काशी क्षेत्रीं जाऊन त्यांनी भागीरथीचें दर्शन घेतलें. तिथेंच त्यांना मोक्ष प्राप्त झाला.

श्रीलक्ष्मीनारायण समाधिस्त झाल्यावर त्यांचे शिष्य श्रीलक्ष्मीकांततीर्थ यांना पट्टाभिषेक झाला. ते पर्तगाळ तसेंच होन्नावर या दोन्ही ठिकाणीं वास करीत. शके १६२९ या वर्षी त्यांनी समाधि घेतली. त्यांची समाधि होन्नावर मठांत आहे.

श्रीलक्ष्मीकांततीर्थांच्या कारकीर्दीत पर्तगाळी संस्थानला जमिनीच्या रूपानं खूप देणग्या मिळाल्या. आणि मठाची आर्थिक स्थिती बरीच सुधारली. या आचार्यांनी भूप्रदक्षिणा केल्याचाहि उल्लेख त्यावेळच्या कागदपत्रांतून मिळतो.

लक्ष्मीकांत स्वामीजींनंतर त्यांचे शिष्य श्रीरमाकांततीर्थ हे पीठाधीश झाले. यापूर्वीच्या स्वामीजींचा मूळ गांव कोणता ही माहिती उपलब्ध नसली तरीही रमाकांततीर्थ स्वामी हे मूळचे लोलये गांवच्या आचार्य घराण्यातले होते. त्यांनी बरीच वर्षे मठाचा कारभार केला. पर्तगाळ व अंकोला या दोन्ही ठिकाणच्या मठातून त्यांचे वास्तव्य असे. आणि अंकोला मठांतच त्यांना शके १६७२ या वर्षी मार्गशीर्ष शु. १ या दिवशी निर्वाण प्राप्त झालें.

श्रीलक्ष्मीकांततीर्थांनंतर श्रीकमलाकांततीर्थ स्वामीजींनी मठाची सूत्रें हाती घेतली. त्यांचीहि कारकीर्द अगदी अल्पच ठरली.

श्रीरमाकांततीर्थांचे शिष्य श्री श्रीकांततीर्थ हे मूळचे पैंगीण गांवातील महालवाड्यावरील भरभुते या कुळांतील. शके १६७५ साली त्यांना पट्टाभिषेक झाला.

## अंगातील ज्वर दंडावर

शके १६९२ सालीं श्रीकांततीर्थस्वामी ज्वराने आजारी पडले. ज्वराने ते अगदीं कृश झाले. अंगात शक्ति बिलकूल राहिली नाहीं. त्यावेळी त्यांनी शिष्य-स्वीकार केला नव्हता. त्यामुळे वीर विठ्ठलाची पूजा त्यांनाच करणे भाग होते. शिवाय त्रिकाळ स्नानहि करणे आवश्यक होते. ह्यावेळीं स्वामीजी आपल्या अंगातील ज्वर दंडावर उतरून ठेवीत असत. स्वामी देवपूजेंत मग्न होत. इकडे ज्वर उतरून ठेवलेला दंड धाड धाड उडत असे. देवपूजा झाल्यावर स्वामीजी परत दंड हातात घेऊन त्यावर उतरून ठेवलेला ज्वर अंगांत घेत असत. ही निव्वळ आख्यायिका नसावी. तिच्यांत कांही तरी तथ्यांश असलाच पाहिजे. कारण अजूनहि ह्या गांवातील कुणाचा ज्वर उतरत नसल्यास त्यास श्रीकांततीर्थांच्या वृन्दावनापुढें बसवून त्याच्या तोंडीं नवस बोलतात. बरे झाल्यावर स्वामीजींनी मुंबईचा प्रवास केला. ह्यावेळीं बंदरांत व इतर कुठेंही स्वामीजींना किंवा त्यांच्या परिवाराला कसलाहि त्रास होऊं नये अशी तजवीज त्यावेळचे पुण्याचे श्रीमंत माधवराव पेशवे यांनी केली असल्याचा मजकूर सांपडतो. श्रीकांततीर्थांची पर्तगाळ मठांतच समाधि घेतली. त्यांचें वृन्दावन पर्तगाळ मठांतच आहे.

परंपरेतील चौदावे आचार्य श्रीभूविजय रामचंद्रतीर्थ होत. हे श्रीकांततीर्थांचे शिष्य. शके १७०० पासून त्यांनी मठाचा कारभार केला. त्यांनी तीर्थयात्राहि केली त्यावेळी ते पोंडुरला आले असतां तेथील राजाने त्यांचा सत्कार केला. यावेळी त्यांची व्यासराज मठाधिपतीशीं भेट झाली.

या स्वामीजींनी केलेलें महत्वाचें कार्य म्हणजे त्यांनी मठाला नियमित उत्पन्न तयार करून ठेवलें. आपले शिष्य श्रीरामनाथतीर्थ यांच्यावर पर्तगाळ मठाची जबाबदारी टाकून ते नेहमीं तीर्थयात्रेतच असत.

ह्यावेळच्या आधीपर्यंत राजकीय परिस्थिती अशी होती की पोर्तुगीजांचा अंमल जुन्या फक्त कालिजादी पुरताच मर्यादित होता. परंतु नंतर पोर्तुगीजांनी काणकोण महाल संवदेकरांकडून आपल्या ताब्यांत मिळविला. आणि पर्तगाळी मठ पोर्तुगीजांच्या अंमलाखाली आणि गोकर्ण व इतर मठ इंग्रजी अंमलाखाली अशी स्थिती झाली.

यानंतरचे स्वामीजी श्रीरमानाथतीर्थ हेहि श्रीकांततीर्थांप्रमाणे पैंगीण गांवच्या करभुते घराण्यांतील होते. 'शापानुग्रह समर्थ' असें त्यांचें वर्णन केले जात असे. ते

एकदां शिवरात्रीस गोकर्ण क्षेत्रीं गेले होते. दुपारी समुद्रावर स्नान करून छत्र चामरें, वाद्य, पालखी इत्यादी सरंजामासह मठांत जात असतांना तेथील अद्वैतवादी ब्राह्मणांनी त्यांना प्रतिबंध केला. दुपारचे कडक ऊन. पायाखाली वाळू तापलेली. त्यामुळें स्वामीस व परिवारास अतोनात त्रास होऊ लागला. अनेक प्रकारे सांगून पाहिलें पण ते खाष्ट ब्राह्मण कसेहि ऐकेनात. तेव्हां श्रीस्वामींचा क्रोध भडकला आणि त्यांच्या क्रोधाचे-मूर्तिमंत अग्नींत रूपांतर होऊन तो अग्नी त्या ब्राह्मणांची घरें जाळीत सुटला. त्याबरोबर ब्राह्मण-वर्ग आपआपल्या घराकडे धावत निघाला. आणि स्वामीजींना वाट मोकळी झाली.

पुढें व्यंकटापूर मठांत ते आजारी पडले. आजारपणामुळें देवपूजा झेपेना. निर्वाणकाळ जवळ आला. अशा वेळीं अकस्मात एक ९–१० वर्षांचा बटू त्यांचे समोर आला. त्याला पाहतांच हा शिष्यस्वीकृतीसाठीं हा योग्य आहे हे स्वामीजींना ओळखलें आणि त्याच्या मस्तकीं वरदहस्त ठेवला. थोड्याच दिवसांनी येथेंच त्यांचे निर्वाण झालें.

## गुजरातेत संचार

त्यांच्यानंतर त्यांचे शिष्य श्रीलक्ष्मीनाथतीर्थ हे पीठाधीश झाले. त्यावेळी ते अगदीच लहान होते. मोठे-पणीं त्यांनी पुष्कळ तीर्थयात्रा केल्या. यावेळी ते बडोदा संस्थानातहि गेले होते. त्यावेळीं बडोद्याच्या महाराजांनी त्यांची पादपूजा केली. व आपणाला पुत्रसंतान नसल्याचें स्वामीजींना सांगितलें. तेव्हां स्वामीजींनीं त्यांना एक फळ अभिमंत्रून दिलें. त्या फळाचे सेवन करतांच बडो-द्याच्या महाराजांना पुत्रप्राप्ती झाली. तेव्हांपासून स्वामीजी हे त्या घराण्याचे एक कुलदैवतच होऊन बसले. त्यांचा बडोद्यांत बरेच दिवस मुक्काम होता. तेथेंच त्यांनी समाधि घेतली. बडोदा शहरात त्यांची समाधि आहे. त्यांनी केलेले महत्वाचे कार्य म्हणणे त्यांनी गोकर्ण येथील नव्या मठाचा जीर्णोद्धार केला. व मठासमोर मारुतीचें ध्वजगोपुरहि उभारलें.

त्यांच्यानंतर त्यांचे शिष्य श्रीआनंदतीर्थ पीठाधीश झाले. ते परंपरेचे १७ वे स्वामीजी, ह्यांनीं मठासाठीं पुष्कळच जमिनी विकत घेतल्या वा दान घेतल्या आणि मठाच्या आर्थिक स्थितीत पुष्कळच सुधारणा केली. स्वतः ते अत्यंत विरक्त म्हणूनच प्रसिद्ध आहेत. पर्तगाळी मठाचा त्यांनी जीर्णोद्धार केला. मठाच्या पटांगणांत मारुतीसाठीं घूडही उभारला. पैंगीण येथील परशुरामाचे देवालयाचा घूड उभारण्यास महाजनांस मदत केली. पैंगीण येथील बेताळ देवालयात उत्सवाच्या वेळीं एक एका वाचण्यांत येतो. तो श्रीआनंदतीर्थानीच शके १७४५ वर्षीं तयार करून दिला.

संस्थानच्या काशी मठालाहि त्यांनी वर्षासन देण्याची तजवीज केली. आपल्या कारकिर्दीत त्यांनी तीर्थयात्राहि केल्या.

## आधुनिक कालखंडातील आचार्य

ह्यानंतरचा काळ हा सर्व प्रकारें वादळी काळ म्हणावा लागेल. गोव्यांत पोर्तगीज सत्ता सुस्थापित झाली होती. जुन्याचा लोप होत जाऊन त्याची जागा नव्याने बळकावण्याचा तो काळ होता.

पर्तगाळी स्वामीपरंपरेतील अठरावे स्वामी श्रीपूर्णप्रज्ञ-तीर्थ हे मूळचे मुडगेरी गांवचे. श्रीआनंदतीर्थ समाधिस्त झाल्यावर ह्यांना पट्टाभिषेक करण्यांत आला. त्यांची कारकीर्द जवळ जवळ पन्नास वर्षांची झाली. त्यांनी मध्वाचार्यांच्या ब्रह्मसूत्राचा चांगला अभ्यास केला होता. इतकेच नव्हे तर आतापर्यंतच्या इतर ग्रंथांचाहि त्यांचा व्यासंग जबरदस्त होता. विद्वान व विरक्त म्हणून ते प्रसिद्ध आहेत. परंतु या अध्यात्मज्ञानाने ते स्वयंकेंद्रित मात्र बनले नाहींत. आपल्या ज्ञानाचा समा-जालाहि उपयोग व्हावा यासाठीं त्यांनीं आपला पुष्कळ काळ विद्यादानांत घालविला. सार्वजनिक हिताचीं कामेंही यांनी केली. पैंगीण येथील गाळणीबाग नदीवरील आणि पार्शे येथील निराकार देवळाच्या मागील खाडी-वरील पूल त्यांनीच बांधविले. तीर्थयात्रेसाठींहि त्यांनी संपूर्ण भारतभर भ्रमण केले होतें. त्यांची विद्वत्ता व अनासक्ति पाहून काशी येथील विद्वानांनीहि त्यांना-मानपत्रें अर्पण केली होती. आपल्या पन्नास वर्षांच्या दीर्घ कालावधींत त्यांनी आपले शिष्य श्रीपद्मनाभ-तीर्थांच्या मदतीनें मठाचा कारभार आणि आर्थिक स्थिति सुधारण्यासाठी खूपच प्रयत्न केले.

श्रीपूर्णप्रज्ञतीर्थांनी शके १७६१ सालीं गोकर्ण मठांत शिष्य-स्वीकार केला. हे १९ व्या परंपरेतील आचार्य म्हणजे श्रीपद्मनाभ तीर्थ. पद्मनाभतीर्थही गुरुप्रमाणेंच दीर्घायुषी ठरले. ही जोडी एकमेकांना अगदी पूरक होती.

गुरु तीर्थयात्रेसाठीं गेल्यावेळीं श्रीपद्मनाभतीर्थ पर्तगाळी मठाचा सर्व कारभार चांगला ठेवीत. गुरुप्रमाणेच त्यांचाहि न्याय, तर्क, व्याकरण आदी विषयाचा व्यासंग जबरदस्त होता. गुरुप्रमाणेंच त्यानीं पुष्कळ तीर्थयात्रा केल्या. त्यांनीहि संस्थानासाठीं पुष्कळ जमिनी मिळवल्या आणि संस्थानचा आर्थिक पाया भक्कम बनविण्यास हातभार लावला.

श्रीपद्मनाभतीर्थाचे शिष्य श्रीइंदिराकांत यांचा काळ म्हणजे गोकर्ण पर्तगाळी मठाच्या कारकीर्दीतील सुवर्ण-काळच म्हणावा लागेल. लहानपणापासूनच एक असामान्य विद्यार्थी म्हणून त्यांची ख्याति होती. भटकळ येथील पुराणिक या नेमिष्ठ आणि विद्वान घराण्यांत त्याचा जन्म झाला. दिसायलाहि ते अत्यंत तेजस्वी होते. त्यांचे व्यक्तिमत्वहि शर्जाविडे होते. त्यांच्या व्यक्तित्वाचे वर्णन करणें ही लेखणीच्या शक्तीच्या पलीकडील गोष्ट आहे. ज्यांना त्यांचे दर्शन घडले ते धन्य होत.

## अधिकारवाणी

वयाच्या १५ व्या वर्षी त्यांना आश्रमदीक्षा देण्यांत आली. आश्रमदीक्षा दिल्यानंतर पद्नमनाभतीर्थांनीं इंदिराकांतजींच्या अभ्यासाची सोय केली. विद्वान पंडिताची या कामी नियुक्ती केली होती. स्वतः गुरु स्वामीहि त्याना पाठ देत होते. मूळांत माती चांगली होती गुरुनी त्यांना फक्त आकार द्यायचे काम करावयाचे होते. वेद, वेदांगे, काव्य, व्याकरण, साहित्य, न्याय, मीमांसा आणि प्रत्येक ज्ञानशास्त्राचे त्यांनी सखोल ज्ञान घेतले. गीता व ब्रह्मसूत्रें यांचा त्यांनी विशेष अभ्यास केला मूळात तीव्र बुद्धि, अभ्यासाची आवड आणि तासन् तास श्रम करण्याची तयारी या गुणांमुळें इंदिराकांततीर्थाची गणना एका विद्वान पंडितांत होऊं लागली. कुठल्याहि विषयावर ते इतके अधिकारवाणीने बोलत असत कीं त्यांच्या विद्वत्ता पाहून देवगुरु बृहस्पतीनेंहि त्यांची पाठ थोपटावी. प्रवचन करण्यांत तर त्यांचा हातखंडा होता. इंदिराकांतजींनी अधिक कीर्ती मिळविली ती प्रवचनांच्याच जोरावर. त्यांचा हा गुण त्यांचे गुरु श्रीपद्मनाभतीर्थ यांचाहि लक्षांत आला होता. त्यांनाहि शिष्य स्वामींबद्दल अभिमान वाटत होता.

इंदिराकांत स्वतः कर्मठ आचार विचारांचे होते. पण बदलत्या काळाची गरज त्यांनी ओळखली होती. तरी-सुद्धां शिष्यवर्गानें आपला धर्म तळमळीने आचरावा असें त्यांना वाटत होते. त्यासाठीं त्यांनी पंचवीसदां संचार केला. सबंध भारतयात्रा केली. हिमालयांतील पुण्य स्थानांचेहि त्यांनी दर्शन घेतलें. शके १८१४ या वर्षी पीठाधिष्ठित झाल्यानंतर चार वर्षांनी त्यांनी नरहरी तीर्थ हा शिष्य निवडला. आणि त्याला आश्रमदीक्षा दिली. नरहरीतीर्थ हेहि गुरुप्रमाणेंच बुद्धिमान होते. स्वतः गुरुस्वामींनी शिष्यस्वामींच्या अभ्यासाकडे विशेष लक्ष पुरविले होते. दीडवर्ष सुमारे असे गेले आणि नंतर अल्पकालीन आजार होऊन नरहरीतीर्थ समाधिस्त झाले.

प्रियशिष्यांच्या अकाली मुक्त होण्याने इंदिराकांतजी-वर आकाशींची कुऱ्हाडच कोसळल्यासारखे झालें. शिष्य-वियोगाने ते इतके दुःखित झाले की त्यानीं अन्नग्रहण करण्याचे सोडून दिलें. अखेरपर्यंत ते फळाहारावरच राहिले. केवढा हा असामान्य निग्रह ! ना कधी कुणी पाहिला ना कधी कुणी ऐकला.

शिष्याच्या अकाल मुक्तीने इंदिराकांत व्यथित व विकल झाले तरी संस्थानच्या कारभाराकडे लक्ष देणें आवश्यक होते. कर्तव्यबुद्धीने ते मठाचा कारभार करीत होते. दहा वर्षे त्यांनी अशा स्थितीत काढलीं आणि पुन्हा दुसऱ्या शिष्याचा स्वीकार केला. आपले शिष्य श्रीकमलानाथांकडे त्यांनी संस्थानचा सारा कार-भार सोपवला आणि उर्वरित आयुष्य संचार करून धर्म जागृति करण्यांत घालविलें. पहिल्या शिष्याच्या मुक्तीच्या आघातानें इंदिराकांततीर्थाचे मन पुष्कळच हळवें झालें होतें. त्याचें मन कमलनाथजीकडे आकृष्ट झालें होते. नूतन शिष्यस्वामीवर त्यांचे स्वतःहूनही जास्त प्रेम होते. त्यांच्या जीवाला जरा कांही बरें वाटेनासे झाले तर इंदिराकांत अगदी गडबडून जात. एकदां तर कमलानाथस्वामींना एक जीवावरचे दुखणे झालें. त्यावेळी इंदिराकांत श्री वीर विठ्ठलासमोर धरणें धरून बसले. अशा अकृत्रिम स्नेहांत हे गुरुशिष्य रमून गेले होते. संस्थानची आर्थिक परिस्थितीही ह्याच काळांत भक्कम झाली. डिचोली येथे अणुजीवोत्तमतीर्थांनी स्थापलेल्या मठांची इंदिराकांतजींनी बांधणी केली.

शिष्यपरिवारांत मतभेदहि ह्या काळांत पुष्कळसे उद्भवले, इंदिराकांतजीना कांहीं वेळां मनःस्तापहि सोसावा लागला. परंतु बुद्धीचा वापर करून त्यांनी सर्व प्रश्न सोडवले. काशी मठ आणि गोकर्ण मठ या दोन्ही मठांत त्यांनी कायमचे सख्य घडवून आणलें.

इंदिराकांत स्वामी म्हणजे ध्येयवादाचा एक मूर्तिमंत

पुतळा. न्यायमीमांसा या रुक्ष विषयांत रस घेणाऱ्या या स्वामींना मुले ही देवाइतकीच आवडत. मुलेंही त्यांच्या भोवतीं घोंटाळत असत. स्वामीजी खडीसाखर, मनुका अशा खाण्याच्या वस्तू हाताशी ठेवीत. एकादें मूल दिसलें की त्यास जवळ बोलवून त्याची विचारपूस करीत आणि त्याच्या हातावर खाऊ ठेवीत. त्यामुळें मुलांनाहि 'व्हडले स्वामी' (गुरुस्वामी) फारच आवडत. त्यांच्या या मुलांवरील प्रेमाची तुलना फक्त महात्मा गांधी आणि नेहरूंशींच होऊं शकेल. मोठ्या कार्यांत गुंतणारे हे महात्मे मुलांबरोबर छोटयांहूनहि छोटे होत. वन्य प्राण्यांवरहि इंदिराकांतांचें फारच प्रेम होतें. त्यांनी एक लहानसे पशुपक्षी संग्रहालयही निर्माण केलें होतें. ते स्वत: त्यांना खाऊं घालीत. त्यांचा परिचित पदरव ऐकतांच ते मुके प्राणीहि त्यांच्याजवळ येत, गोव्यांत गोधनहि त्यांनी भरपूर बाळगले होतें. मुक्या प्राण्यांवरहि प्रेम करणारे हे बहुधा पहिलेच आचार्य होत. विद्वान, बुद्धिमान, तपस्वी, प्रेमळ या गुणांबरोबरच लेखनाचीहि त्यांना आवड होती. चारशे पृष्ठांएवढा गीतेवरील भाष्याचा ग्रंथहि त्यांनी लिहिला आहे. त्यांचे प्रशिष्य श्रीद्वारकानाथतीर्थ यांनी पन्नास वर्षांनंतर त्यांच्या या ग्रंथाची तिसरी आवृत्ती प्रसिद्ध केली आहे. गीताभाष्या-शिवाय 'गीतागौरव', 'न्यायमीमांसा', 'द्वैतबोधिनी' असेहि ग्रंथ त्यांनी लिहिले आहेत. सागरामाचार्य श्रीमत् सुनिती भागवतावर त्यांनी टीकाहि लिहिली आहे. एवढी ग्रंथ-संपत्ति निर्माण करणारे आचार्य श्रीगोकर्ण पर्तगाळी मटाच्या परंपरेंतील हे पहिलेच होत.

## महानिर्वाण

शके १८६४, चैत्र वद्य सप्तमी हा त्यांच्या अवतार समाप्तीचा दिन. या दिवशी रात्री बाराच्या सुमारास ते समाधिस्त झाले. शिष्यपरिवारास दु:खसागरांत लोटून ते अनंतांत विलीन झाले.

इंदिराकांत समाधिस्त झाल्यानंतर त्यांचे शिष्य श्रीकमलनाथ पीठाधिष्टित झाले. आपले गुरु श्री इंदिरा--कांत यांच्या इतके नसले तरी तेही एक विद्वान पंडित होते. तसेच व्यवहारांतही ते निपुण होते. इंदिराकांतांचा बहुतेक काळ संचार आणि तीर्थयात्रा यांतच गेला. त्यावेळीं मठाचा कारभार स्वत: श्रीकमलानाथ यांनीच पाहिला. सर्व प्रकारच्या आर्थिक घडामोडी कुशलतेने हाताळून त्यांनी मठाचा आर्थिक पाया भरभक्कम केला. मठासाठीं सुमारे शंभरावर ठिकाणें त्यांनीं मिळवली. त्यांची गुरुभक्तीहि अतुलनीय होती. इंदिराकांतांनी सर्व कारभार जरी त्यांच्याच हातीं सोंपविला होता तरी कुठलीहि गोष्ट करतांना ते गुरुंचा सल्ला घेत. कारवारच्या मुरलीधर मठाची स्थापना आणि गोकर्ण व व्यंकटपुर मठाची जीर्णोद्धारहि त्यांनीच केला.

पीठाधीश म्हणून त्यांची कारकीर्द अगदीं अल्पच ठरली. इतकी अल्प कीं ती अवधी ११ महिने वीस दिवस इतकीच ठरली. इंदिराकांत शके १८६४ चैत्र वद्य ७ मीस समाधिस्त झाले आणि त्यांचे शिष्य गुरुभक्तपरायण श्रीकमलनाथ यांनी शके १८६५ ह्या वर्षी चैत्र शुक्ल एकादशीस समाधी घेतली. त्यापूर्वी त्यांनीं शिष्यस्वीकार केला. इंदिराकांतांनीच नियक्त केलेल्या बटूला त्यांनी आश्रम दिला. तेच श्रीमद् द्वारकानाथतीर्थ स्वामी.

श्रीमठाचे २२ वे स्वामी श्रीमद् द्वारकानाथतीर्थ यांचा पट्टाभिषेक शके १८६५ मध्ये झाला व जवळ-जवळ तीस वर्षे त्यांनी आपली गौरवशाली कारकीर्द समर्थपणे चालविली. या कालावधींत मठाचा कारभार अधिक योजनाबद्ध, सुव्यवस्थित करण्यामाठी त्यांनी उपाय योजले पण तसे करताना अखंड परंपरा व मठाचे मांगल्य यांना कोणत्याच प्रकारे बाधा पोचणार नाही याची दक्षता घेतली आणि मठाच्या गौरवात मोलाची भर घातली. त्यांचे प्रसन्न व्यक्तिमत्व आम्हा सर्वांना सुपरिचित आहे. आसेतुहिमाचल भारत-वर्षाचा संचार करून त्यांनी शिष्यवर्गाला वेळोवेळी मार्गदर्शन केलें व अनेक जीर्णोद्धाराचीं कामेही हाती घेतली. त्यांचे आशीर्वाद मिळविण्याचे भाग्य आम्हा सर्वांनाच लाभलेले आहे. त्यांची विद्वत्ता, बुद्धिमत्ता, शांत प्रेमळ वृत्ति, दानशूरता आदीचा आपण सर्वांनीं प्रत्यक्ष अनुभव घेतला आहे. मुंबई येथील द्वारकानाथ भवन व श्रीराममंदिर ही त्यांच्या गौरवशाली कारकीर्दीची स्मारके म्हणता येईल. दक्षिणेकडे संचारार्थ गेले असतांना श्रीमद् द्वारकानाथ स्वामीजीचे दि. १५ मार्च १९७३ रोजी (फाल्गुन वद्य ६ ष्टी शके १८९५) अंकोला येथील मठात महानिर्वाण झाल्यावर पर्तगाळ येथे इतर पीठाधीशांच्या वृन्दावनालगत त्यांचे वृन्दावन उभरण्यांत आले.

श्रीमठाच्या पीठाधीशांच्या परंपरेचा हा आढाव मंदाकिनीच्या परिक्रमे इतकाच पवित्र असून तो वाचून वाचकांची जिज्ञासा जरी जागृत झाली तरी लेखकाचा हेतु साध्य झाला असे म्हणता येईल.

# श्रीपर्तगाळ मठ आणि स्वामी महाराज

2306

—माधवराव तळावलीकर

उपाध्यक्ष: पंचशताब्दि महोत्सव समिती

आमच्या सांप्रदायाच्या मठाच्या स्थापनेस ५०० वर्षे पूर्ण होत आहेत. मठाच्या पंचशताब्दि सोहळ्यात सहभागी होण्याचे परमभाग्य आम्हां सर्वांना लाभत आहे याबद्दल आम्ही स्वतःला धन्य समजले पाहिजे. आमच्या मठाचे वैशिष्ठ्य म्हणजे प्रत्येक मठाधिशाची त्यागवृद्धी. आमच्या सर्व मठाधिशांनी राजयोग असूनही वैभव न भोगता फक्त धर्मप्रचार केला. लोकजागृती केली व हरतऱ्हेचे कष्ट सोसून वैष्णव सांप्रदाय व पर्यायाने हिंदुधर्म वृद्धिगत केला.

पंचशताब्दिनिमित्त होऊ घातलेल्या स्नेहसंमेलनाच्या निमित्ताने आपण सर्व श्री पर्तगाळ या पवित्र स्थळी एकत्र येणार आहोत. पर्तगाळ हे एका सुंदर व विकसनशील परपरेचे केंद्रपीठ आहे. भारतातले वैष्णव सांप्रदायी सारस्वताचा व या पवित्र स्थानाचा अतूट असा निकटचा संबंध आहे.

येथे या नदीच्या किनारीं मोठा इतिहास घडलेला आहे. या पावन आणि भरघोस इतिहासातून आमच्या मठाला आणि येथे भरत असलेल्या स्नेहसंमेलनाला, बळ व तेज प्राप्त होईल असा मला पूर्ण विश्वास आहे.

मी या इतिहासाचा मुद्दाम उल्लेख करण्याचे कारण हेच की मठस्थापनेच्या कालांत हिंदू जीवनपद्धतीला विनाशाचा धोका उत्पन्न झाला होता. आजही हिंदू जीवनपद्धती व मूल्ये तितकीच विनाशाच्या कड्यावर उभी आहेत. पांचशे वर्षापूर्वी उत्पन्न झालेला धोका परक्याकडून—पोर्तुगीजांकडून होता आणि उघड होता. आजचा धोका छुपा आहे आणि परकीयांकडूनच नव्हे तर आंतून स्वकीयांकडून हा धोका उत्पन्न झालेला आहे. उघड आव्हानाला तोंड देणे जरी जास्त कठीण असले तरी ते आवश्यक आहे हे मात्र नक्की.

सन १५१० साली पोर्तुगीजांनी गोवा घेतला. व सासष्ठी महालात हिंदूंच्या ख्रिस्तीकरणास १५६० पासून सुरवात झाली. सन १५७४ साली श्रीमंगेश देवालय जमीनदोस्त करण्यांत आले व त्याच्या जागी चर्च उभारण्यात आले. पुढे १५६६ साली केळशी येथील श्री शांतादुर्गा देवीचे मंदिर जाळण्यात येऊन त्याच साली श्रीरामनाथ देवालयाचा विध्वंस करण्यात आला. सन १५६७ मध्ये सासष्टीतील सर्व हिंदू देवळे मोडून व जाळून टाकण्यात आली. बाटाबाटीला ऊत आला व या दुर्धर प्रसंगामुळे कांही लोक अंत्रुज म्हणजे फोंडा महालात व अनेक लोक कारवार, कुमठा, मंगळूर कोचीन येथे पळून गेले. म्हणूनच सारस्वतांचा एक फार मोठा वर्ग त्या ठिकाणी सापडतो.

पोर्तुगीज मिशनऱ्यांनी, राज्यकर्त्यांनी व अन्य धर्मवेड्यानी साडेचारशे वर्षाहूनहि अधिक काळ गोव्यात अनिर्बंध सत्तेचा फायदा घेऊन सतत जाळपोळी, बाटाबाटी, दडपणे, अडवणूक, हत्या वगैरे क्रूर मार्गांचा व साधनांचा अवलंब केला व हिंदूंना सतत सतावण्याचा उपक्रम चालू ठेवला. सर्व तऱ्हेची हत्याकांडे करून निरपराधी हिंदूंच्या कत्तली केल्या तरी देखील आज आमच्या गोमंतकात ६२ टक्के संख्या हिंदूंची आहे या गोष्टीचा मला मुद्दाम उल्लेख केला पाहिजे. या बाबतीत आवश्यक तो प्रतिकार करताना ज्या आमच्या पीठाधिशांनी व आमच्या पूर्वजांनी अमाप धैर्य दाखवून हिंदूधर्म जिवंत ठेवला त्यांच्यापुढे आम्ही खरोखरच नतमस्तक झाले पाहिजे. साडेचारशे वर्षाहूनही अधिक काळ गोव्यात अनिर्बंध अधिसत्ता असूनहि त्यांना फारसे कांही करता आले नाहीं या गोष्टीचा सिंहाचा वाटा आमच्या मठाधिशांचा आहे हे नाकबूल करता येणे शक्य नाही.

आज आमच्या मध्ये असलेले श्रीमत् विद्याधिराजतीर्थ स्वामी महाराज हे त्याच पवित्र गादीचे वारस आहेत. पूर्वीच्या सर्व मठाधिशांनी व विशेषतः श्रीमत् द्वारकानाथतीर्थ स्वामी महाराजांनी जे धर्मवृद्धीचे केले सुरू केले तेच कार्य आज चे स्वामी महाराज योग्य प्रकारे चालवीत आहोत हे नमूद करण्यास किंचितही संशय नाहीं.

श्रीमत् द्वारकानाथतीर्थ स्वामी आम्हांस दुःखसागरात लोटून श्रीहरी पदंगत होऊन आज चार वर्षे होऊन गेली तरीही स्वामीजींचे ते तेजःपुंज, धीरोदत्त, भारदस्त, आकर्षक व सर्वांना मोहून टाकणारे व्यक्तिमत्व आमच्या स्मृतीपटलावरून किंचिंतही दूर झाले नाहीं. आपल्या स्वतःच्या व्यासंगाचा, ज्ञानाचा आणि पुरोगामी विचारांच्या सहाय्याने गोकर्ण पर्तगाळ मठाला भारतामध्ये एक मानाचे स्थान मिळवून दिले. आपल्या ३१ वर्षाच्या कारकीर्दीत सांप्रदाय दृष्टचा व सानाजिक दृष्टचा फारच उपयुक्त आणि उल्लेखनीय असे कार्य केले. श्रीद्वारकानाथ तीर्थ स्वामीजींच्या व्यक्तिमत्वामध्यें जे अनेक गुण समाविष्ट झाले होते त्यामध्ये मातेप्रमाणे पोटाशी धरण्याचे वात्सल्य, शब्दांत मायेचा ओलावा, दृष्टीत कृपा, वागणुकीत जवळीक हे गुण जास्त तेजाने व प्रामुख्याने तळपत होते. क्रांतीकारक मतांचे सुद्धा हमतमुखाने स्वागत करून शंकाखोरांचे समाधान करणे ही एक दुर्मिळ कला स्वामींजीमध्ये होती. त्याची लोकसंग्रह करण्याची उपजत वृत्ती आणि फक्त शिष्यगणांविषयींच नव्हे तर येणाऱ्या जाणाऱ्या प्रत्येक माणसाविषयीचे अगत्य या दोन गोष्टी सर्वांच्या परिचयाच्या आहेत.

श्रीमत् द्वारकानाथतीर्थ स्वामीजींनी आपल्या सांप्रदायाचे कल्याण करण्याचा अनेक बाजूंनीं प्रयत्न केला व तो बहुतांशी सफलही झाला पण माझ्या दृष्टीने त्यांचे आमच्या समाजावरील एक मोठें आणि सर्वांना उपकृत करणारे ऋण म्हणजे त्यांनी आपल्यामागे परमपूज्य विद्याधिराजतीर्थ महाराजांच्या रुपाने आम्हांस एका स्वयंभू तेजाने तळपणाऱ्या दैदिप्यमान, शुद्ध व अमोल रत्नाची देणगी दिली की जिचे विस्मरण आम्हांस केव्हाही होणे शक्य नाही. कोणाचीही दृष्ट लागेल असा हा ठेवा आमच्याकडे सुपूर्द करूनच श्री द्वारकानाथतीर्थ स्वामीजींनी महानिर्वाण केले. ह्या ठेव्याचे आम्ही सर्व वैष्णव समाजाने पराकाष्ठेचे प्रयत्न करून जतन केले पाहिजे. ह्या ठेव्याचा आमच्या आध्यात्मिक व धार्मिक अभिवृद्धीसाठी लाभ करून घेणे आमचे आद्य कर्तव्य ठरते. हा अलभ्य लाभ आम्हास सदोदित मिळो हीच श्रीचरणीं प्रार्थना.

परमपूज्य श्रीविद्याधिराजतीर्थ स्वामी महाराजांस आरोग्य व दीर्घायुष्य लाभो अशी श्री वीर विठ्ठल व श्रीस्वामी महाराजांचे पूर्वाश्रमीचे व माझें कुलदैवत श्रीरामनाथ चरणीं प्रार्थना.

---

# एक निग्रही, तरुण तपस्वी
# श्रीमद्  विद्याधिराजतीर्थ स्वामीजी
(यांच्या खास मुलाखतीचा वृत्तांत)

मडगावहून निघालेली आमची मोटार करमल घाट पार करून काणकोणच्या दिशेनें धावूं लागली आहे. करमलघाटांतील प्रवास हाच मुळी एका अननुभूत अशा आनंदाचा साक्षात्कार घडविणारा! सागर आणि डोंगर यांचे एवढें निकट सान्निध्य क्वचितच आढळतें. दुतर्फा उंच वृक्षराजी, एका अंगाला उंच डोंगर व दुसऱ्या अंगाला खोल दरी. उताराला लागतांच दिसणारा दूरवर धरणीमातेचें चरणमल धुणारा सागर. हें दृश्यच मुळी भान हरपून टाकणारें! अनिपरिचयानें देखील त्या सौंदर्यात उणेपणा येऊं शकलेला नाही. अलीकडेच वनखात्याने नव्या लागवडीच्या प्रयोगासाठी वृक्षसंहार कार्य शास्त्रशुद्ध पद्धतीनें उरकले असूनहि या मार्गातील प्रवासांत मिळणारा आनंद कमी झालेला नाही. मोटार काणकोण पार करून सदाशिवगडच्या दिशेने पुढें निघाली नि श्रीसंस्थान पर्तगाळी असा फलक दिसतांच डावीकडील आडमार्गाकडे वळून उतरणीला लागली आणि आमच्या मनावरील दडपण अधिकच वाढले. क्षणांत पांढरा शुभ्र उंच मनोरा आणि समोर एका पुष्यपुरातन वास्तूच्या अग्रभागी चमकणारा कळस दिसला. उंच वृक्षांनी आसमंत हिरवागार व सुखशीतल बनलेल्या प्रशांत ठिकाणी वसलेल्या या वास्तूवर एखाद्या ऋषीच्या आश्रमाची छटा पसरली होती. अर्थात ही वास्तू आधुनिक जगाशीं सुसंवाद राखूनहि, गजबजापासून दूर राहून समाजाला ऐहिक अभ्युदयाचा व पारमार्थिक सुखाचा मार्ग दाखविणाऱ्या एका पीठाची वास्तू आहे. गेली पांच शतकें या मठाने हें कार्य प्रभावीपणें चालविले आहे, आणि त्यामुळेंच अनुयायांची मठावरील व पीठस्थ स्वामीजींवरील श्रद्धा व निष्ठा आजच्या विज्ञाननिष्ठ युगांतहि कायम राहिली आहे. मताच्या या गौरवशाली परंपरेने पांच शतकें पार केल्याची स्मृति म्हणून व पुढील कार्याची दिशा ठरविण्यासाठी मठाचा पंचशताब्दिमहोत्सव यंदां साजरा होत आहे. त्या निमित्त मठाचे देशाच्या कानाकोपऱ्यांत पसरलेले, पण मठाशीं अविचल निष्ठा बाळगून असलेले असंख्य अनुयायी येथे एकत्र जमणार आहेत.

आम्ही मठापाशी पोहोंचलों तेव्हां या महोत्सवाची तयारी जोरांत चालू होती. रस्ता रुंद व पक्का बनविण्याचें, मठासमोरील विस्तीर्ण पटांगण मंडपाच्या उभारणीसाठी सुयोग्य बनविण्याचें काम चाललेलें व त्याकामीं अनेक मजूर गुंतलेले आढळले. ही सर्व सिद्धताच महोत्सवाच्या भव्यतेची कल्पना येण्यास पुरेशी आहे. आम्ही मठांत पोहोंचलों. श्रीरामदेवाचे दर्शन घेतलें. श्री वीरविठ्ठलाचें दर्शन घेतलें. वृन्दावनाचें दर्शन घेतलें. मठाचे यापूर्वी बावीस स्वामी होऊन गेलेले असून, त्यांपैकीं काहीं स्वामीचीं वृन्दावनें येथें आहेत. एवढ्या मोठ्या संख्येनें वृन्दावनें हें या मठाचें खास वैशिष्ट्य असून ते मठाच्या अनुयायांचें व भाविकांचें एक प्रमुख दर्शनस्थान ठरलें आहे.

मठाचे विद्यमान गुरुस्वामीजी श्रीमद् विद्याधिराजतीर्थ हे या परंपरेतील तेविसावे स्वामी होत. पंचशताब्दी महोत्सवामागील प्रमुख प्रेरणा श्रीमद् विद्याधिराजतीर्थ यांची असून, आंग्ल विद्याविभूषित असूनहि भारताची समाजधारणोन्मुख संन्यस्तवृत्तीची परंपरा चालू ठेवण्याचें व्रत घेऊन पीठस्थ झाल्यापासून स्वामीजींनी मठाचें कार्य अधिकाधिक गतिमान व जीवनाच्या बदलत्या मूल्यांना पोषक बनविण्यासाठीं योजनाबद्ध प्रयत्न चालविले आहेत. या पंचशताब्दिमहोत्सवाच्या निमित्ताने स्वामीजींचें दर्शन घेऊन त्यांच्याशीं मनमोकळी बातचीत करण्याच्या इराद्यानें आम्ही मठांत आलों होतों. आम्हीं मठांत पोहोंचलों तेव्हां स्वामीजी पाठशाळेंत असल्याचें कळलें. आम्ही आल्याचा निरोप स्वामीजींना मिळाला आणि स्वामीजी लगेच आपल्या बैठकीच्या कक्षांत आले. आम्ही आंत जाऊन स्वामीजींचें दर्शन घेतलें. आणि क्षेमकुशल पृच्छेनंतर आम्हीं मठांत येण्यामागील आमचा हेतु बोलून दाखविला. वेळ थोडा असल्याचें सांगून कोणताहि प्रश्न विचारण्यास स्वामीजींनीं आम्हांला अनुज्ञा दिली. काळवेळ कोणतीहि असली तरी प्रश्नांचे उत्तर एकच राहिल असेंहि स्वामीजींनीं सांगितलें. स्वामीजी पलंगावर पहुडले; त्यांतहि आपण बसूं शकत नसल्याचें पाहून त्यांना होणारी व्यथा त्यांच्या

खूपच भिन्नता असल्याचें स्वामीजींनीं सांगितलें. जोंपर्यंत गुरु श्रीमद् द्वारकानाथतीर्थ स्वामी होते तोंवर काम करूनहि प्रत्यक्ष भार नव्हता. ताण नव्हता. पण श्रीमद् द्वारकानाथतीर्थ स्वामीजी वृन्दावनस्थ झाल्या-नंतर (२५-३-१९७३) श्रीमद् विद्याधिराजतीर्थ स्वामी-जींवर सबंध मठाचा भार येऊन पडला. (पीठारोहण : ५-४-१९७३) केवळ मठच नव्हे तर मठाचे भारतभर विखुरलेले अनुयायी व एकंदर समाज यांना मार्गदर्शन करण्याची मोठी जबाबदारी स्वामीजींच्या शिरावर आली. स्वामीजींनी ती किती समर्थपणें उचलली व मठाला कशी विज्ञानोन्मुख दिशा दिली, अनुयायांचे मठाकडील संबंध कसे दृढ केले ही गोष्ट सर्वपरिचित आहे. पंचशताब्दि महोत्सव सोहळ्यांत त्याचा खरा-खुरा साक्षात्कार घडूं शकेल. सुसूत्र दिनचर्या व कामाचा उरक यामुळें स्वामीजीना अल्पवयांत ही शिरावर पडलेली मठाची जबाबदारी यंतांच ताण जरूर जाणवला. पण शिष्यवर्गांतील जाणते लोक व अन्य मठाभिमानी यांचें सक्रिय सहकार्य लाभल्यानें तो भार सुसह्य झाला, अशी मनमोकळी कबुली स्वामीजींनीं दिली.

मठाचें मुख्य कार्य कोणतें; अशी पृच्छा केली असतां स्वामीजींची मुद्रा किंचित धीरगंभीर बनली. आमच्या मनांतील विकल्प दूर कसा करावा याचाच विचार स्वामीजी करीत असावेत असें दिसलें. स्वामीजी म्हणाले, "हा मठ प्रामुख्यानें एका संप्रदायाचा आहे. त्यादृष्टीनें त्या समाजाची आध्यात्मिक व धार्मिक जागृति करून त्यामध्यें मंगल व उदात्त तत्त्वांचा विकास घडवून, त्या समाजाला ऐहिक व पारमार्थिक सुखाचा मार्ग दाखविणें हें मठाचे मुख्य कार्य होय. परंतु आजच्या परिस्थितींत कोणत्याहि संप्रदायाची सुखसमृद्धि समाजाच्या अन्य घटकांपासून अलग राहून साधतां येत नाहीं म्हणूनच आजूबाजूचा समाजहि सुखी असेल याची दखल मठाच्या अनुयायांनीं घेतली पाहिजे."

याशिवाय समाजाला वेळोवेळीं मार्गदर्शन करणें तंटे, संघर्ष यांचें वातावरण उद्भवल्यास त्याचें निवारण करणें आणि हें सर्व अधिक प्रभावीपणें पार पाडतां यावें या यासाठीं आध्यात्मिक साधना अखंड चालू ठेवणें हें या पीठावर बसणाऱ्यांचें जीवनकार्य आहे. स्वामीजींचे जीवन हें कांहीं एका जागीं बसण्याचें नाहीं. आरामाचें नाहीं. खुद्द स्वामीजींची घाईगर्दीची दैनंदिनी पाहिली तरी याची कल्पना येऊं शकते. रोज पांच-सहा तास धार्मिक विधींत खर्च होतात. मठांतील पाठशाळेवर ते जातीनें देखरेख ठेवतात. श्रीक्षेत्र काशी, गोकर्ण वगैरे अनेक ठिकाणीं असलेल्या या मठांच्या कक्षेंतील एकावन्नवर मठांचा कारभार सुव्यवस्थित चालावा म्हणन काळजी घ्यावी लागते. जेथें जेथें मठाचे अनुयायी आहेत तेथे तेथें वेळोवेळीं संचार करून, त्यांच्यातील आत्मविश्वास बळकट करावा लागतो.

या संदर्भात अलीकडेच घडलेली घटना स्वामीजींच्या दूरदृष्टीची कल्पना येण्यास पुरेशी आहे. केरळ राज्यांत कायंगोळ येथे मठाचे अभिमानी वास्तव्य करून आहेत. तेथें त्यांनी श्री विठोबाचें एक देवस्थान उभारलें आहे. यासंबंधींची खबर अशी कीं श्रीमद् इंदिराकान्ततीर्थ स्वामीजी एकदां दक्षिण संचारावर असतांना कायंगोळ येथे गेले. तेथील कांहीं लोकांकडून स्वामीजींचा अनादर झाला असें सांगतात. याचा परिणाम असा झाला कीं त्या कुटुंबांना उपसर्ग होऊं लागला. तेथील लोकांनीं श्रीमद् द्वारकानाथतीर्थ स्वामीजींना कायंगोळ मुक्कामी येऊन जुन्या प्रमादाबद्दल क्षमा करावी अशी पापमुक्त कर-ण्याची प्रार्थना केली. श्रीमद् द्वारकानाथतीर्थ स्वामी-जींनीं निमंत्रण स्वीकारून कायंगोळला जाण्याचा निर्णय घेतला होता. पण विधिसंकेत वेगळा असल्यानें तें घडून येऊं शकलें नाहीं. तथापि गतवर्षी श्रीमद् विद्या-धिराजतीर्थ स्वामीजींनीं आपल्या गुरुचा संकल्प पूर्ण केला. गतवर्षी कायंगोळ येथे चातुर्मास व्रतास्तव सव्वा चार महिने वास्तव्य करून स्वामीजींनीं तेथील शिष्य-वर्गाला आनंदित केलें. त्यांच्या मनांत घर करून बसलेल्या पापकल्पनेचें निरसन झालें आणि तेथील समाजाचे मठाशीं नातें दृढ झालें. अर्थात वरील हकीकत कोणीतरी सांगितलेली ! खुद्द श्रीमद् विद्याधिराजतीर्थ स्वामी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षरीत्या आख्यायिका, चम-त्कार यांना पुष्टि मिळेल असें कोणतेंहि विधान करण्याचें कटाक्षानें टाळतात. ते धर्मनिष्ठ आहेत व धर्माचा आजच्या व्यवहारांत युक्त असा अन्वयार्थ लावण्यांत तरबेज आहेत, हें आम्हांला त्यांच्याशीं बोलतांना वेळोवेळीं जाणवत होतें. अंधश्रद्धा स्वामीजींना मान्य नाहीं. डोळस श्रद्धेवर त्यांचा भर आहे. त्यांची दृष्टि विज्ञाननिष्ठ आहे. विज्ञाननिष्ठ या अर्थानें कीं पाप-पुण्याच्या संकल्पनांची सत्यासत्यता बाजूला ठेवली

चेहऱ्यावर स्पष्ट दृगोचर होत होती. एका दुर्दैवी घटने-मुळें स्वामीजींच्या पाठीच्या मणक्याला इजा झालेली आहे आणि त्यामुळे स्वामीजींना बसण्याचा त्रास होतो. तरीहि बसूनच प्रश्नांची उत्तरे देण्याचा स्वामीजींचा निग्रह दिसत होता. शेवटी आम्हीच स्वामीजींना न बसण्याची विनंती केली व त्यांनीं ती मानली. आणि आणि एका अनौपचारिक मनमोकळ्या वातावरणांत आमची मुलाखत सुरू झाली. मठाचे, स्वामीजींच्या समोर वागण्याचे रीतिरिवाज आम्हांला माहित नसल्या-मुळें बोलण्याच्या ओघात एखाद्या वेडावाकडा प्रश्न निघाल्यास स्वामीजींनी गैरसमज करूं नये अशी आम्हीं विनंती केली. विशालभाल, सरळ नासिका, पाणीदार नेत्र आणि याच्या जोडीला विरक्तिदर्शक भगवीं वस्त्रें असे प्रसन्न व्यक्तिमत्व आमच्यासमोर. आमच्या अन्त-करणाचा ठाव घेत मंचकावर पहुडले होते. आमच्या अंतःकरणावरील दडपण पार गेले आणि एका मुक्त वातावरणांत झालेल्या चर्चेत तास-दीड तास कसा गेला तें आम्हांस कळलेंदेखील नाहीं.

चर्चेला गति देण्यासाठीं सूत्र सांपडावें म्हणून आम्हीं सर्वप्रथम स्वामीजींना त्यांच्या पूर्वाश्रमाविषयीं, संन्यासा-श्रमांत प्रवेशाच्या वेळीं होणाऱ्या मानसिक स्थित्यंतरा-विषयीं, मठाचीं सूत्रें हातीं घेतल्यानंतरच्या मनःस्थिति-विषयी, मठातील दैनंदिनीविषयीं प्रश्न विचारले आणि स्वामीजींनी मनांत कांहींहि न ठेवतां अगदी तटस्थ वृत्तीनें आमच्या प्रश्नांना उत्तरें दिलीं. स्वामीजींनीं दिलेल्या माहितीप्रमाणें बालपणांत व विद्यार्थीदशेंत मठाशीं स्वामीजींचा तसा विशेष संबंध आला नव्हता. श्रीमद्द्वारकानाथतीर्थ स्वामीजींना एक-दोन वेळां पाहिलें असेल व त्यांची थोडीफार सेवा केली असेल तेवढेंच! मठाचा व आपला वेगळ्या पद्धतीनें म्हणजे स्वामी म्हणून संबंध कधीं काळीं येईल याची त्यावेळीं मुळींच कल्पना नव्हती. जीवनाची दिशाच वेगळी होती. धर्म-निष्ठ व ईश्वरोपासक आचार्य कुटुंबांत जन्मलेले श्रीमद् विद्याधिराजतीर्थ मातापित्यांचे द्वितीय पुत्र. श्रीमद् द्वारकानाथतीर्थ स्वामीजींनीं आपले उत्तराधिकारी म्हणून निवड केली त्यावेळी श्रीमद् विद्याधिराजतीर्थ स्वामीजी कॉमर्स कॉलिजमध्यें शिकत होते. मातापित्यानीं आपला भविष्यांतील आधार म्हणून पुत्राला उच्च शिक्षणार्थ महाविद्यालयांत पाठविलें होतें. परंतु अचानक शिष्य म्हणून आपली निवड केल्याचा आज्ञारायस श्रीमद् द्वारकानाथतीर्थ स्वामीजींनीं काढला. या अन-पेक्षित प्रकारामुळें कुटुंबांत आनंद व अपेक्षाभंग यांनीं वातावरण विचित्र बनलें. आपला पुत्र उच्च विद्या-विभूषित होऊन आपल्या कुलाचें नांव उज्वल करण्या-बरोबरच घरसंसारांत सुखसमृद्धि आणील ही माता-पित्याची अपेक्षा भुईसपाट झाली होती. ज्याच्यावर आपण सगळी भिस्त ठेवली तो आपला पुत्र कायमचा अंतरणार ही व्यथा त्यामागें होती. त्याचबरोबर स्वामीजींविषयींची भक्ति व मठाविषयींचा आदर-यामुळें घरच्या लोकांची मनस्थिति द्विधा होत होती. गांवच्या प्रतिष्ठित लोकांचें, स्वामीजींचा आज्ञारायस पाळावा म्हणून दडपण येत होतें. यामुळें या तरुण विद्यार्थ्याचा आयुष्यक्रम एका रात्रींत बदलला. (संन्या-साश्रम दिन : २६-२-१९६७).

या प्रसंगीं खुद्द स्वामीजींच्या मनाची कोणती अवस्था झाली? अशी पृच्छा केली असतां स्वामीजी म्हणाले, वयाची वीस वर्षे कौटुंबिक वातावरणांत व आधुनिक शिक्षण देणाऱ्या विद्यालय महाविद्यालयांत गेल्यामुळें संन्यासी जीवनाची निश्चित अशी कल्पना नव्हती. अर्थात तशी सुजाणता होती पण प्रत्यक्ष तसें जीवन आमच्या वाट्याला येईल हें माहित नव्हतें. तथापि स्वामीजींच्या आज्ञारायसाची वार्ता ऐकून आम्ही अस्वस्थहि झालों नाहीं वा त्याबद्दल वाईटही वाटलें नाहीं. समाजाची वेगळ्या प्रकारें सेवा घडावी अशी स्वामीजींची इच्छा व ईश्वरी संकेत असेल तर आपणही त्याला अनुकूल बनलें पाहिजे एवढाच विचार त्यावेळीं मनांत आला. आणि दहा वर्षांपूर्वी विशींत पदार्पण करतांनाच स्वामीजी नव्या जीवनाला सामोरे जाण्यास सिद्ध झाले.

शिष्य म्हणून दीक्षा घेतल्यानंतरचा गेल्या दहा वर्षांचा काळ, त्यामध्यें केलेली साधना, अध्ययन, नित्य-कर्मे यांविषयीं स्वामीजींनी तपशीलवार माहिती दिली. या काळांत स्वामीजींनी खूप अध्ययन, मनन व चिंतन केले. पीठाधीशपदाची धुरा सांभाळण्यासाठीं आव-श्यक शिक्षण घेतलें. ही साधना आजतागायत अविरत चालू आहे. संन्यास घेतल्यानंतरहि प्रत्यक्ष पीठाची सूत्रें हातीं घेण्यापूर्वीचा काल व नंतरचा काल यामध्यें

तर समाजाच्या निकोप धारणेसाठी माणसाच्या स्वैर मनाला लगाम घालण्यासाठीं अशा कांहीं अमूर्त, मानवाची शक्ति व बुद्धि जेथे पोहचूं शकत नाहीं अशा, कल्पनांची गरज आहे असे त्यांना वाटतें. ईश्वरभक्ती-पासून मिळणाऱ्या पुण्याच्या संचय केल्याने, बँकेंत केलेली बचत अडचणीच्या वेळीं जशी सव्याज मिळते तद्वतच हें संचित पुण्य प्रत्येक मानवाला प्रापंचिक कटकटीच्या वेळी तोल ढळूं न देण्यासाठीं उपयोगी पडतें. स्वामीजींचा हा विचार सयुक्तिक आहे हें कोणीहि मान्य करील. मठासंबंधी ऐकिवांत असलेल्या कांही गोष्टींचा आम्हीं उल्लेख केला असतां स्वामीजींनी त्यांच्यासबंधीं कसलेंहि भाष्य करण्यास नकार दिला. त्या खऱ्या आहेत असें ध्वजिन करण्याचें देखील त्यांनीं टाळलें.

मठाच्या प्रदीर्घ परंपरेविषयीं बोलतांना स्वामीजी म्हणाले, 'मठाची परंपरा पांचशें वर्षांची असली तरी प्रत्यक्षांत मठाकडे साडेतोनशें वर्षांपासूनचे कागदपत्र आहेत.' पूर्वी घोडयावरून वा मेण्यांतून संचार करावा लागे. त्यामुळें वाटेत कागद गहाळ झाले असण्याची किंवा अन्य मठांत ठेवले असण्याची शक्यता आहे. पोर्तुगीजांच्या स्वारीच्या वेळीं यांपैकीं कांही उध्वस्त झाले असावेत. अनेक इतिहाससंशोधकांनी विविध लिपींतील व भाषांतील कागदपत्रांचा अभ्यास करून मठाच्या व मठानुयायांच्या इतिहासावर प्रकाश टाकलेला आहे. तथापि या सर्व कागदपत्रांचा सुसंगत, तपशील-वार व तटस्थ अभ्यास अद्याप होऊं शकलेला नाहीं. तसा तो झाल्यास केवळ या समाजाचाच नव्हे तर एकंदर इतिहासावर फार मोठा प्रकाश पडूं शकेल. पंचशताब्दि महोत्सवाच्या निमित्तानें हें कार्य हातीं घेतलें गेलें पाहिजे.

पोर्तुगीजांच्या आक्रमणामुळें गोव्यातील मंदिरें उध्वस्त झाली. अशा वेळीं डळमळीत झालेली समा-जांतील धर्मश्रद्धा पुन्हा बळकट करून, लोकांच्या मनांत ईश्वरभक्ती जागविण्याचें व त्याद्वारें नवीं मंदिरें उभार-ण्यास त्यांना प्रवृत्त करण्याचें कार्य मठानें केले आणि त्याबद्दल अखिल गोमंतकानें मठाचे ऋणी राहिलें पाहिजे. ज्यांची कुलदैवतें आज गोव्यांत आहेत अशीं अनेक कुटुंबें त्याकरतां देशोधडीला लागून केरळापर्यंत पसरली त्या लोकांना त्यांच्या धर्मभूमीकडे संपर्क ठेवण्याचें कार्य मठानें केले. असे स्वामीजींनीं अभिमानपूर्वक सांगितलें. हें सांगतांना स्वामीजींचे नेत्र एका विशिष्ट तेजानें प्रकाशमान झाल्याचें जाणवलें.

पंचशताब्दी साजरा करणाऱ्या या मठापेक्षा किंवा सारखेच प्राचीन असे अनेक मठ आहेत ही गोष्ट स्वामी-जींनी मनमोकळेपणे मान्य केली आणि उदाहरणादाखल शृंगेरीच्या श्रीशारदापीठाचा निर्देश केला. आपलाच मठ श्रेष्ठ, प्राचीन अशा अहंभावाचा लवलेशदेखील स्वामीजींच्या बोलण्यांत जाणवला नाहीं. इतरांचा मोठेपणा कबूल करतांना ते गांगरले नाहींत कीं स्वतःचा मोठेपणा सांगतांना ते फुलले नाहींत. फक्त काही विशिष्ट मर्यादेत व क्षेत्रांत मठानें बजावलेल्या कार्याची स्वामीजींनी माहिती दिली. एकेकाळी समाज समुद्रगमन हें पाप मानून, अशांना वाळींत टाकीत असे. असे प्रश्न समाजासमोर उपस्थित राहिले त्यावेळी मठाने पुढाकार घेऊन तो प्रश्न सोडविला. या प्रश्नांचा विचार करण्यासाठीं श्रीमंदिरदिराकांत स्वामीजींनी वेलिंग मुक्कामीं सर्व गौड सारस्वत ब्राम्हणांची एक महासभा बोलावली व याच सभेत असें ठरलें कीं समुद्रगमन केलेल्यांनी अल्प प्रायश्चित घेतल्यावर त्यांचा स्वीकार व्हावा. हा ठराव संप्रदायाच्या तिन्ही पीठांकडे प्रेषित करण्याचेंहि ठरविण्यांत आले. आणि सर्वप्रथम श्रीसंस्थान गोकर्ण पर्तगाळी जीवोत्तम मठाधिशांनी ठराव स्वीकारून अशा लोकांस पुनित करण्यास मान्यता दिली. आजच्या काळांत आंतरजातीय, आंतरधर्मीय विवाह होतात, असे प्रश्न निर्णयार्थ आल्यास मठाची कोणती भूमिका राहील हें जाणून घेण्याची इच्छा आम्ही व्यक्त केली तेव्हां 'मठाचे सामर्थ्य हें अनुयायांच्या त्या-वरील श्रद्धेवर आहे. असे प्रश्न प्रामुख्याने समाजाचे आहेत. समाजानेच त्यांचा विचार करायचा आहे. तथापि असे प्रश्न अद्याप मठासमोर आलेले नाहीत' असें स्वामीजींनी सांगितले.

सारस्वत समाजाला आपला संदेश कोणता ? असे विचारतां स्वामीजी म्हणाले, सारस्वत समाज हा अतीव पुढारलेला, विचाराने प्रगल्भ व भौतिक दृष्टयाहि प्रगत असा आहे. हा समाज कर्तृत्वशाली व स्वाभिमानी आहे. यापुढें या समाजानें आपल्या शक्ति, बुद्धी, कर्तुत्वाचा उपयोग एकंदर समाजाच्या विकासासाठीं केला पाहिजे. शेष समाजापासून तो अलग राहूं शकणार नाहीं व

तसें करून चालणारही नाही. समाजाच्या अन्य घटकांना विश्वासांत घेऊन त्याने त्यांच्याशीं सलोखा निर्माण केला पाहिजे. यामुळे सारस्वत समाज तर विकसित होईलच. शिवाय एकंदर समाजांचे धुरीणत्व त्यांच्याकडे आपोआप चालत येईल. कर्तत्ववान, समर्थ, बुद्धिमान वर्गाकडे समाजाचे नेतृत्व असणे हें एकंदर समाजाच्या हिताचे असते.

मठाने एकंदर समाजाच्या कल्याणासाठीं अनेकविध सेवा सुरू केल्या आहेत. हुबळी, मुंबई येथे वैद्यकीय सेवा सोय उपलब्ध करून देण्यांत आलेली असून तिचा लाभ सर्व जाती-धर्म-पंथाच्या लोकांना मुक्तपणे घेतां येतो. याशिवाय मठाच्या जनकल्याणकर अशा अनेक योजना आहेत व या पंचशताब्दि महोत्सवाच्या निमित्ताने साकारतील असा विश्वास स्वामीजींनीं व्यक्त केला.

स्वामीजींच्या खासगी जीवनांत, अंतर्मनांत डोकावून पाहतां आल्यास पहावें या हेतूनें मातापित्यांविषयीं आज स्वामीजींच्या मनांत कोणती भावना आहे. त्यांच्या दर्शनाने आज स्वामीजींना काय वाटतें, ते जाणून घेण्याची आम्ही इच्छा व्यक्त केली. स्वामीजींनीं सांगितले कीं आपल्या मनांत त्यांच्याविषयीं आतां शिष्यपरिवारां-पैकीं एक या परती खास अशी कोणतीहि भावना नाहीं. माता स्वामीजींना नमस्कार करीत नाहीत व वडील समोर श्रीमद् भागवत ग्रंथ ठेवून नमस्कार करतात एवढाच काय तो फरक ! आपले पूर्वाश्रमीचे मातापिता म्हणून त्यांना संस्थानांतून कांहीं द्यावें, त्यांचा संसारभार हलका करावा असे मनांत देखील येत नसल्याचें बोलून दाखविले. मातोश्रींचा 'श्रीधराली आवय' असा निर्देश करून तर स्वामीजींनी आम्हांला धक्काच दिला. मात्र यावेळीं स्वामीजींनी स्वर कांहींसा कातर झाल्याचा आम्हांला संशय आला. अर्थात स्वामीजींच्या निग्रहाची हीच कसोटी आहे यांत संशय नाहीं.

मुलाखत संपवून आम्ही उठलो त्यावेळीं अकरा वाजून गेले होते. आमच्या मुलाखतीमुळें स्वामीजींचे दैनिक कार्यक्रमाचे वेळापत्रक चुकले होते. सकाळचे साडेदहा ही स्वामीजींची स्नानाची वेळ आहे. त्यानंतर पूजा आदि विधींसाठी दोन तासांपेक्षा अधिक काळ जातो. त्यामुळे स्नानास विलंब झाल्यास संपूर्ण वेळा-पत्रकच चुकते. स्वामीजींनी हंसत हंसत आम्हांला त्याची कल्पना दिली. एक निग्रही तरुण तपस्वी आपल्या दैनंदिन स्नानासाठी निघाले आणि आम्ही भारावल्या अंतःकरणानें मडगांवच्या परतीच्या प्रवासाला लागलो.

---

We feel ourselves glorious
To witness the *Panch-Shatabdi Mahotsav*,
in which we can fortunately participate,
A radiant Era of our Math.



**VENKATESH YESHWANT PAI & BROS.,**

**&**

**YESHWANT MEDICAL STORES**

CHAWDI, CANACONA-GOA.

On this sacred occasion of
*PANCH-SHATABDI MAHOTSAV*, a
Golden Era in the history of our Age-old Math,
Our infinite "Pranams" to the
Lotus Feet of their Holiness
All our Param Pujya Sadgurus
Who showered their Love and Blessings on us throughout.

**BHANUDAS BABLO SHENVI KOSSAMBE**

Mine Owner, Authorised Civil Contractor & Industrialist

P. O. Box 297,
Near Old Power House,
MARGAO-GOA

Phones :
Margao : 2697 (Office)
2497 ( Res.)
Sanguem : 25

